# बोला अमृत बोला



निवेदन

**मास्टर कृष्णराव**

शब्दांकन

**सुधाकर अनवलीकर**

# बोला अमृत बोला

निवेदन

मा. कृष्णराव

शब्दांकन

सुधाकर अनवलीकर



सुपर्ण प्रकाशन, पुणे

प्रथमावृत्ती

विजयादशमी १९८५

प्रकाशक

सौ. सुनिता मिरासदार
सुपर्ण प्रकाशन
१५५२, चिमणबाग
सदाशिव पेठ, पुणे : ४११ ०३०.

मुद्रक

अजित शशिकान्त देव
सुलभ मुद्रणालय,
२९१ शनवार पेठ
पुणे ४११ ०३०


A२३, गणेश पॅलेस
रामनगर, सुखी जीवन हौ. सोसायटीजवळ
डोंबिवली ( पूर्व ) जि. ठाणे.

मुखपृष्ठ

मुकुंद तळवलकर

मुखपृष्ठ छपाई

त्रिमूर्ती आर्टस, पुणे.

**किंमत २५ रुपये**

संगीत-कला-निधी मा. कृष्णराव
यांच्या आठवणी
' महाराष्ट्र टाइम्स 'च्या साप्ताहिक
आवृत्तीत क्रमश: प्रसिद्ध झाल्या.
या आठवणी पुस्तकरूपाने प्रकाशित
करण्याची परवानगी ' महाराष्ट्र टाइम्स 'चे
संपादक श्री. गोविंद तळवलकर यांनी
दिली; त्याबद्दल मनःपूर्वक आभार.

# पुरस्कार

१९३२ साली मी पहिल्यांदा मास्तर कृष्णरावांची बैठक ऐकली ती देवधरांच्या क्लासमध्ये. मला वाटतं ती सकाळी झाली होती. गवयी म्हटला की, खूप जोरकस गाणारा, गमकाच्या ताना मारणारा असा माझा समज होता. पण मास्तरांचं गाणं ऐकलं आणि अतिशय तरल आवाज असलेला, स्वतःला पाहिजे तसा गळा फिरवणारा, गोड गायकी असणारा गवयी म्हणजे मास्टर कृष्णराव असा माझा समज झाला. त्या वेळी मास्तरांचं नाव खूप गाजत होतं.

१९४१ साली ' नाट्यनिकेतन ' ही संस्था रांगणेकरांनी स्थापन केली. पहिलं नाटक ' आशीर्वाद '. ४२ साली ' कुलवधू ' हे नाटक बसवायला घेतलं. डी. पी. कोरगावकर हे संगीत देणार होते आणि त्यांनी एका गाण्याला चाल पण लावली. नंतर ते कुठे सिनेमात अडकले कोण जाणे! तालमी चालू पण संगीत दिग्दर्शकाचा पत्ता नाही. किती वाट पाहणार? ९ ऑगस्ट ही तारीख पण ठरली होती. एकदम रांगणेकरांच्या डोक्यात आलं की, मास्तर महिन्यातून १५ दिवस मुंबईला येतात. दादरला त्यांचा एक फ्लॅट आहे. श्री. रांगणेकरांनी मला विचारलं, ' मास्तरांना विचारू का?' मी म्हटलं : ' जरूर.' रांगणेकर तसेच मास्तरांकडे गेले आणि त्यांना नाटकाचं कथानक सांगितलं. " ज्योत्स्नाबाई गाणार आहेत, तर मग जरूर चाली देतो " मास्तर म्हणाले. या गोष्टी आठ-दहा दिवसातल्याच आहेत. लगेच रांगणेकरांनी नाटकातले प्रसंग सांगितले. मास्तरांनी स्वतःचे शब्द घालून एक चाल म्हणून दाखवली. पहिलं गाणं, ' क्षण आला भाग्याचा.' नंतर दुसऱ्या अंकात ' मनरमणा ', तिसऱ्या अंकात ' बोला अमृत बोला ' या सर्व चाली एका दिवसातल्या. दुसऱ्या दिवशी हीरोच्या

म्हणजे अविनाशच्या ( गणपतराव मोहिते ) चाली. मग मास्तर तालमीला यायला लागले. चाली बसत चालल्या. ‘ कुलवधू ’च्या पहिल्या प्रयोगाची तारीख ऑपेरा हाऊसवर ९ ऑगस्ट ही पक्की झाली. प्रयोगाच्या दोन दिवस आधी मास्तरांच्या डोक्यात आलं, एक ‘ द्वंद्वगीत ’ घालावं. मी म्हटलं, “ चाल कधी करणार ? आणि शब्द कसे पाठ होतील ? ” पण मास्तरांना आमच्याबद्दल भलताच विश्वास होता. रविवारी प्रयोग आणि आदल्याच शुक्रवारी हे ‘ द्वंद्वगीत ’ जन्माला आलं. ‘ भाग्यवती मी त्रिभुवनी झाले, कुबेर माझा धनी.’ गाण्यातून भाग्य हा शब्द खूप वेळा आला; पण त्या नाटकाच्या तालमी सुरू झाल्यापासून इतकी नाना तऱ्हेची संकटं उभी रहायची की, विचारू नका ! मला अगदी वाटायचं हे नाटक काही रंगभूमीवर उभं राहात नाही. शेवटलं संकट म्हणजे पहिलाच प्रयोग बंद. ‘ चले जाव ’ची चळवळ सुरू झाली. ‘ गांधी महाराज की जय ’ या घोषणांनी मुंबई दुमदुमली. मी ऑपेरा हाऊसवर जायला निघालेली. तो मोठा समुदाय पाहून कुणाच्या तरी घरात शिरले. ९ तारीख गेली, १६ गेली आणि २३ तारखेला सकाळी ऑपेरा हाऊसला पहिला प्रयोग झाला आणि दुपारी दामोदर हॉलमध्ये २३ ऑगस्टला एका सुंदर नाटकाचा जन्म झाला.

सकाळी ९ वाजता ऑपेरा हाऊसचा मखमली दर्शनी पडदा घंटानादाने वर गेला. तो पहिला प्रयोग, ती सुंदर सकाळ मी कधीच विसरणार नाही. पहिल्याच अंकातलं “ किती तरी आतुर प्रेम अपुले ” हे अविनाशांचं गाणं. अंकाच्या शेवटी सारंग रागातलं पद “ का वदती ” हे होतं— सारंग त्या वेळी इतका सुंदर वाटला ! सर्व वातावरण नुसतं भारून गेलं होतं. प्रेक्षक हळूहळू नाटकात रमू लागले होते. भानुमतीची ( मी ) एन्ट्री आणि लगेच ‘ भाग्यवती मी ’ हे गीत. नंतर ‘ क्षण आला भाग्याचा.’ जो प्रयोग रंगू लागला म्हणून सांगू ! लोकांना वेगळं पण चांगलं असं काही मिळत होतं. एकापेक्षा एक वरचढ गाणी, तसेच नाटकतले: प्रसंग. मास्तर कृष्णराव पहिल्या प्रयोगाला हजर होतेच. ‘ मनरमणा मधुसुदना ’ या भजनाची चाल जरा बाळबोध वळणाची आहे असे सगळ्यांनाच वाटत होतं. मी भीत भीत मास्तरांना म्हटलं, “ ही चाल थोडी वेगळी केली तर बरं होईल. फारच साधी वाटते.’ लगेच मास्तर म्हणाले, ‘ कोण म्हणतं ? या गाण्याला वन्समोअर पडला नाही तर मी संगीत दिग्दर्शनाचं काम सोडून देईन.’ काय हा आत्मविश्वास. आणि झालंही तसंच. भजन संपल्यावर जेव्हा टाळ्यांचा कडकडाट झाला आणि वन्समोअर मिळाला तेव्हा मास्तर ‘ विंग ’मध्येच होते. मी आत गेल्यावर ते मला म्हणाले, “ काय सांगितलं

होतं मी. पटलं ना !" नंतर शेवटच्या भैरवीनं तर कळस गाठला. 'बोला'ने थिएटर नुसतं भरून गेलं. लोक नाटकावर, संगीतावर आणि आमच्यावर बेहद्द खूप होऊन गेले. असा झाला 'कुलवधू'चा पहिला प्रयोग. नंतर 'एक होता म्हातारा, कोणे एके काळी, भाग्योदय' या नाटकांना मास्तरांनी चाली दिल्या. नाटक आणि संगीत यांचा जेव्हा नीट मेळ बसतो तेव्हाच ती गाणी लोकांच्या तोंडी बसतात आणि मास्तरांनी ते सिद्ध केलं. 'एक होता म्हातारा' मधली गाणी आणि चाली छान होत्या. त्यातलं 'छंद तुझा मजला' हे गाणं लोकांना खूप आवडलं होतं.

नंतर बऱ्याच वर्षांनी म्हणजे १९५३ साली मास्तरांचा निकटचा सहवास घडला. आम्ही चीनच्या दौऱ्यावर बरोबर गेलो. आम्हा सर्वांना ते जुन्या कंपनीच्या गोष्टी सांगून खूप हसवायचे. मुंबईहून दमयंती जोशी (नृत्य), विलायत हुसेन खाँ (सतार), मधुकर इंदूरकर (तबला), पुण्याहून मी, हिराबाई बडोदेकर, मास्तर कृष्णराव, मधुकर गोळवलकर ही मंडळी होती. दीड महिना आम्ही चीनमध्ये होतो.

आमचा पहिला कार्यक्रम पेकिंग या राजधानीत झाला. तेव्हा तिथले आपले राजदूत राघवन् म्हणून होते. ते या कार्यक्रमाला उपस्थित होते. आपल्या देशात वंदेमातरम् आपण शेवटी म्हणतो; पण तिथं आम्ही ठरवलं होतं की कार्यक्रम सुरुच मुळी 'वंदेमातरम्'ने करायचा. तसा तो सुरु झाला. आम्ही बसून गाणारे. म्हणून माईकची व्यवस्था खाली केली होती. पण 'वंदेमातरम्' आम्ही उभं राहून म्हटलं त्यामुळं ते बाहेर कमी ऐकू गेलं. आमचे नेते बंगाली होते— सेनगुप्ता. माणूस जरा तऱ्हेवाईकच होता. आत आले नि म्हणाले, 'पुअर शो, पुअर शो !' आम्हाला काही कळेचना. म्हणाले, 'वन्देमातरम् उद्यापासून म्हणायचं नाही.' मला खूप वाईट वाटलं, आणि रागही आला. मी म्हटलं 'काय म्हणून बंद करायचं ? याच राष्ट्रगीतानं सुरुवात करायची.' मी सगळयांच्या सह्या घेतल्या आणि असाच कार्यक्रम सुरु होणार म्हणून त्यांना सांगितलं. पुढच्या कार्यक्रमाच्या नंतर राघवन् सौ. सह आत आले आणि म्हणाले, 'राष्ट्रगीत ऐकताना माझे डोळे भरून आले. इतकं सुंदर तुम्ही सर्वांनी म्हटलं की माझं अंतःकरण भरून आलं.' मी डायरीत त्यांची सही घेतली.

एक दिवस आमचा व एक दिवस चिनी कलावंतांचा कार्यक्रम व्हायचा. नाटक, संगीत व नृत्य फक्त दोन तास. मधुकर गोळवलकर आमच्या कार्यक्रमाचं निवेदन इंग्लीशमध्ये करायचे. नंतर त्याचे इंटरप्रीटर चिनी भाषेत निवेदन करायचे. कलावंतांचं नाव घेताना ते मजेशीर उच्चार करायचे. मास्तरांचं नाव 'फूल अंबीकर' असं उच्चारायचे. एकंदर दीड

महिन्यात आम्ही पेकिंगपासून आठ दहा गावात कार्यक्रम केले. मास्तरांच्या जेवणाखाण्याकडे मीच लक्ष देत असे. जेवण आलं की विचारायचे " ज्योत्स्नाबाई, जेवू ना ? बघा. नाही तर प्लेटमध्ये झुरळं वगैरे उकडून ठेवली नाहीत ना ! " अशा एकेक गंमतीत दिवस मजेत जायचे.

काय झालं कोण जाणे, एक दिवस जेवण झाल्यावर माझ्या पोटात खूप कळा यायला लागल्या. बाकीची मंडळी ' चायनीज ग्रेट वॉल ' बघायला गेली होती. मी आणि हिराबाई अशा दोघीच हॉटेलवर होतो. इतक्यात वसंतराव परांजपे मला भेटायला आले, तर मी कॉटवर तळमळते आहे. त्यांनी हिराबाईंकडे चौकशी केली. वसंतरावांनी लगेच मला हॉस्पिटलमध्ये नेले. रात्री साडेदहावाजेपर्यंत पोटदुखी कायम होती. आम्हाला वाटलं फूड पॉयझनिंग झालं असावं. पण तो किडनी अॅटॅक होता. मास्तर हॉस्पिटलमध्ये मला भेटायला आले आणि मला पाहून त्यांना आपले अश्रू आवरेनात. दुसऱ्या दिवशी दुसऱ्या गावाला जायचं होतं. मास्तर म्हणाले, ' मी जात नाही. ज्योत्स्नाबाईंना अशा स्थितीत टाकून मला जाववत नाही.' मीच मग त्यांना सांगितलं की मास्तर जा तुम्ही. दमयंती थांबते आहे माझ्यासाठी. मास्तर फार हळवे होते स्वभावानं. दीड महिन्याने आमचा दौरा संपला. ' हिंदी चिनी भाई भाई ' म्हणता म्हणता शस्त्र घेऊन उठले की वर्षात !

मास्तरांच्या शेवटच्या आजारपणात त्यांना घरी भेटायला गेलं की आधी ते रडायचे. मला अतिशय वाईट वाटायचं. गोव्याच्या पद्धतीचं खाणं काही अंशी त्यांना खावंसं वाटे. ते मी घरी नेऊन देत असे. एकदा त्यांनी मला असंच काय काय घेऊन या म्हणून सांगितलं आणि मी कुठंतरी बाहेर गावी गेले होते. मास्तरांचं दुखणं जास्त झालं. घरी आल्यावर माझी सून नंदा म्हणाली, " आई, मास्तरांना जास्त बरं नाही. तुम्ही त्यांना कबूल केलं होतं, सोजी आणि खदखदं करून आणते म्हणून. आधी तुम्ही भेटून या." भेटायला गेले. मास्तर बरे होते. मी विचारलं ' कधी घेऊन येऊ, गोव्याचे पदार्थ ? एक दिवस डबा घेऊन गेले. मास्तरांनी मनापासून सर्व खाल्लं.

संगीत कला अकादमीचं अॅवॉर्ड घ्यायला मास्तर दिल्लीला जाणं शक्य नव्हतं. त्यामुळे सेक्रेटरी श्री. मेनन पुण्याला आले होते. त्यांच्या घरी त्यांचा सत्कार. आम्ही सर्वजण होतो—भीमसेन, हिराबाई, के. डी. दीक्षित, पी. एल., वसंतराव वगैरे. पी. एल्. म्हणाले, ' ज्योत्स्नाबाई चार शब्द बोलतील.' मी काय बोलणार ? पण जे चार शब्द निघाले त्यांनी सर्वांचे डोळे पाणावले एवढेच मला आठवतं. पी. एल. म्हणाले, ' ज्योत्स्नाबाई,

बोलता येत नाही म्हणालात आणि आम्हाला रडवलंत ना !' 'ते अंतःकरण बोललं, मी नव्हे !'

अशा मास्तरांच्या किती तरी आठवणी. सांगाव्यात तेवढ्या थोड्या. 'बोला अमृत बोला' या पुस्तकातील श्री. सुधाकर अनवलीकर यांनी शब्दांकित केलेल्या आठवणी मला पुन्हा माझ्या गतायुष्यात घेऊन जातात. या पुस्तकाच्या रूपाने मास्टर कृष्णराव यांच्या अनेक आठवणींचा खजिनाच पुन्हा आपल्यापुढे उभा केला आहे. आठवणींचे असे भाग्यशाली क्षण कसे वळवाच्या पावसासारखे येतात आणि आले आले म्हणता म्हणता निघूनही जातात. स्मृतीच्या कवेत सामावून ठेवावेत म्हटलं तरी सामावत नाहीत. पण या पुस्तकाच्या रूपाने मात्र मास्तरांच्या आयुष्यातील आठवणी मराठी रसिकांपर्यंत पोहचविण्याची अत्यंत चांगली कामगिरी श्री. सुधाकर अनवलीकर यांनी केली आहे. त्याबद्दल त्यांना व प्रकाशकांना धन्यवाद !

**ज्योत्स्ना भोळे**

# प्रस्तावना

सुमारे पंधरा-एक वर्षांपूर्वीची गोष्ट ! सदाशिव पेठेतील भावेस्कूलच्या पिछाडीला असलेल्या लिमयेवाडीतील एका घरात मी बिचकत प्रवेश केला.

‘ मास्टर कृष्णराव फुलंब्रीकर ’ अशी दारावर पाटी होती. जुनी, जीर्ण झालेली. ‘ आहेत—नाहीत ’ या अक्षरांवरील पट्टिका धड ‘ आहेत ’ वरही नव्हती आणि ‘ नाहीत ’ वरही नव्हती. ती मधेच होती. दार बंदच होते. दारावरील ‘ बेल ’ दाबावी, का न दाबावी या विचारात मी पडलो. अखेरीस मनाचा हिय्या केला आणि बेल दाबली. मास्तरांच्या गड्यानं दार उघडलं. ‘ मास्तर आहेत का ’ ? मी प्रश्न केला.

‘ आहेत, या ! ’ गड्यानं उत्तर दिलं. मी आत शिरतो तोच वरून आवाज आला ‘ कोण आहे रे ? ’ आतील जिन्याच्या लाकडी पायऱ्या चढून मी हलकेच वर गेलो. ‘ मास्तर, मी आलोय.’ ‘ अरे व्वा, या बसा ’ मास्तर म्हणाले.

ट्रान्झिस्टरला कान लावून मास्तर क्रिकेटची कॉमेन्ट्री ऐकत होते. भारताची कुठल्या तरी परदेशी संघाबरोबर टेस्ट मॅच चालू होती. मास्तर त्यात रंगून गेले होते. खेळाडूने चौकार ठोकला की ‘ व्वा ! बहोत अच्छा’ या शब्दात एखाद्या होतकरू गायकाला दाद द्यावी तसे ते दाद द्यावयाचे. बराच वेळ हे चाललं होतं. अखेरीस खेळ कंटाळवाणा होऊ लागला, तसं त्यांचं लक्ष ट्रान्झिस्टरवरून उडू लागलं. ‘ काय खेळतात लेकाचे ! यांना झारे आणि पळ्या घेऊन एखाद्या नाटक कंपनीत आचारी नाही तर वाढपी म्हणून ठेवले पाहिजे. म्हणे क्रिकेट खेळतात ’ मास्तर मला उद्देशून म्हणाले, मीही मान डोलावली.

मनाशी योजून आलेला बेत मास्तरांना कसा काय सांगावा आणि केव्हा सांगावा, याबद्दल माझी चुळबुळ सुरू झाली होती. आणि मास्तर तर क्रिकेटची कॉमेन्ट्री ऐकण्यात दंग झाले होते.

त्या अगोदर चार पाच दिवसांपूर्वीच श्री. पु. ल. देशपांडे यांची एका समारंभात गाठ पडली होती. बोलता बोलता ते म्हणाले, ‘ बातमीदार, एक फार मोठं घबाड आहे. पण ते कसं हस्तगत करतायेईल, ते तुम्हीच बघा.’

मास्तरांना भेटण्यासाठी पु. ल. देशपांडे त्यांच्या घरी गेले होते. 'हल्ली काय चाललंय' असं त्यांनी नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे मास्तरांना विचारलं. 'हल्ली मी काही कुठं बाहेर जात नाही. घरीच असतो. आत्मचरित्र लिहावं, असा विचार आहे. बघू जमलं तर'....मास्तर म्हणाले.

त्यावर पु. ल. म्हणाले... 'मास्तर, मनाशी जुळवाजुळव तर करून ठेवा. पाहू पुढं काय करायचं ते !'

मास्तरांशी झालेला हा संवाद पु. ल. नी मला सांगितला. माझी प्रतिक्रिया काय होते याचा त्यांनी अंदाज घेतला. 'मास्तरांचं चरित्र मिळविणे ही सोपी गोष्ट नाही. ते अतिशय व्यवहारी आहेत. माणसाची पारख करूनच ते निर्णय घेतील. तेव्हा तूच बघ काय करायचं ते. पण एक सांगतो, मास्तरांचं 'जीवन' कष्टाचं, लाख मोलाचं आहे. कुणी तरी ते केले पाहिजे. आत्मचरित्राच राहू दे. निदान त्यांच्या मोलाच्या आठवणी तरी तू नोंदून घे. वाचकांनाही भूतकाळात जाता येईल.'

पु. लं. ची भेट झाल्यापासून मास्तरांना कधी एकदा गाठतो, असं मला झालं. आणि पुढच्या काही दिवसातच मी मास्तरांच्या समोर बसलो होतो. कॉमेन्ट्री चालूच होती. टीमच्या अगोदरच आम्ही आमचा 'टी टाइम' उरकून घेतला होता. पण मूळ विषयाला हात घालू देण्याची संधीच मास्तर देत नव्हते. विषयाच्या अगदी जवळ यावं, आणि कुणी तरी खेळाडूनं चौकार हाणावा... लगेच मास्तरांचं त्यावर भाष्य. शेवटी काही तरी विचारायचं म्हणून मी विचारलं, 'मास्तर, तुम्हाला क्रिकेटचं एवढं वेड कसं ?'

'त्याचं काय आहे'.... कुठलंही बोलणं सुरू करण्यापूर्वी मास्तर या ठराविक वाक्यानं सुरुवात करीत. त्यांची ती लकब होती.

'संगीताच्या अगोदर मला क्रिकेटचेच वेड जास्त होतं. भास्कर-बुवांकडं मी गाणं शिकत होतो. रोज दुपारी तीन वाजता बुवा मला गायन समजावून शिकवीत. १९१४–१५ सालची गोष्ट ही. त्याच वेळी पी. वाय. सी. वर क्रिकेटची मॅच चालू होती. मला काही मोह आवरेना. म्हणून दोन दिवस मी मॅच पाहाण्यात घालवले. काही तरी खोटंच कारण बुवांना सांगितले. पण सत्य थोडंच लपतं. बुवांना खरं कारण कळताच त्यांनी मला काठीनं झोडपून काढलं.... असं आमचं क्रिकेटचं वेड.'— मास्तरांनी दिलखुलासपणानं खुलासा केला.

मास्तर हे सांगत होते. मधून मधून ट्रान्झिस्टर ऐकत होते. अखेरीस खेळ संपला. आणि मी त्यांच्या आत्मचरित्राचा विषय काढला.

मास्तर थोडे विचारात पडले. पण लगेच म्हणाले–'देशपांड्याचंही तसंच मत आहे. पण हे करणार कोण? तयारी आहे का तुमची? मी माझ्या केवळ आठवणी सांगेन. तुम्ही तुमच्या शब्दात साकार करा. वस्तुस्थिती मात्र कायम ठेवा. त्यात सत्य असतं.'

'उद्यापासून...मी रोज येत जाईन. तुम्ही फक्त बोला' मी म्हणालो.

'ठीक आहे. उद्यापासून करू सुरुवात. सकाळी नऊ वाजताच या.' मास्तरांनी सांगितले. आनंदाच्या भरात मी परतलो.

यानंतर सतत दोन तीन महिने मास्तरांचा मला अगदी जवळून सहवास लाभला. मास्तरांची स्मरणशक्ती विलक्षण होती. पन्नास साठ वर्षापूर्वीच्या घटना, व्यक्ती, तारीख, स्थळ या साऱ्या गोष्टी त्यांच्या डोळ्यांपुढं अगदी चित्राप्रमाणे उभ्या रहात. अगदी बारीक तपशीलासह ते या सर्व गोष्टी सांगत. घडलेल्या गोष्टींचं कालक्रमानुसार अशा प्रकारे वर्णन करणं ही काही सोपी गोष्ट नव्हे! पण मास्तर ते सहज करीत. सतत आठवणी ऐकायच्या. मुद्दे काढायचे. घरी गेल्यावर त्या व्यवस्थितपणे लिहून काढावयाच्या... 'महाराष्ट्र टाइम्स'च्या साप्ताहिक आवृत्तीसाठी मुद्रणप्रत करायची या गोष्टी नित्याच्या झाल्या होत्या. त्यामुळे कधी कधी कंटाळा यायचा, अशावेळी मास्तर आपल्या खास ठेवणीतले विनोद मला सांगायचे. विनोद सांगून झाल्यावर, 'काय? कसा वाटला?' असे म्हणून टाळी देण्यासाठी हात पुढे करीत. ही त्यांची आणखी एक लकब! निवेदन चालू असताना ते असे किती तरी विनोद सांगत. आल्या-गेल्याशी गप्पा मारत, मधून मधून त्यांचं पान खाणं चालूच असे. पण आठवणींचा मूळ धागा मात्र ते घट्ट धरून असत.

कधीमधी एखादा नवशिका गायक त्यांच्याकडे ठाण मांडून बसायचा. आपलं गाणं मास्तरांनी ऐकावं, अशी त्याची इच्छा असायची. मास्तर त्याला नाउमेद करीत नसत. गाणं ऐकून झाल्यावर ते त्याला काही सूचना करीत असत.

भास्करबुवा बखले यांनी चीजांचा 'खजाना' मास्तरांच्या गळी उतरविला होता. बुवांचीही मास्तरांनी कमालीची सेवा केली. घरची गरिबी. खाणारी तोंडे जास्त. परिस्थितीमुळे शिक्षण घेता येईना. पण गाण्याचं अंग मूळचंच, म्हणून 'कृष्णाला' बुवांकडे ठेवले. बुवांच्या कठोर शिस्तीत मास्तरांनी गाण्याचे धडे घेतले. खडतर साधना केली. बुवांचे एकमेव शिष्य म्हणून 'कृष्णराव' मान्यता पावले. मरताना भास्करबुवा मास्तरांना म्हणाले. 'कृष्णा, माझं मन खूप राखलंस. तुझ्याकरिता मी सोन्याचं शेत लावलंय, खूप गात जा. खूप खात जा.'

मला अजूनही तो प्रसंग जसाच्या तसा आठवतो. भास्करबुवांच्या आठवणी ते सांगत होते. त्यांचा रागीट स्वभाव, त्यांचं मनस्वी प्रेम, शिकविण्याची कळकळ, खोटं बोलल्याबद्दल बुवांनी पाठ काळी निळी होईपर्यंत दिलेला चोप. बुवांच्या या आठवणी सांगताना मास्तरांना भडभडून येत होते. एके दिवशी तर भावनांचा एवढा मोठा उद्रेक झाला की, मास्तरांना अक्षरशः रडू कोसळलं. सुमारे दहा ते पंधरा मिनिटं ते रडतच होते. काही क्षण गेल्यावर तेच म्हणाले—'आज एवढंच पुरे. मला विश्रांती हवी.' या आठवणीचा मास्तरांच्यावर एवढा परिणाम झाला की, चार पाच दिवस त्यांना अजिबात काही सुचलंच नाही. माझं लेखन थांबलं होतं.

खडतर साधना केल्यानंतर बुवांबरोबर मा. कृष्णरावांनी गायनाच्या निमित्ताने अगदी अल्पवयातच भारतभर भ्रमण केलं होतं. जलशांचे कार्यक्रम होत, तेव्हा कृष्णरावांनाही टेंबे, बालगंधर्व यांच्या बरोबरीने गायनाची संधी मिळे. काकासाहेब खाडिलकर, देवल, बोडस यांच्याशी परिचय होऊन नाट्यशिक्षणाचे धडेही त्यांच्या हाताखाली गिरविण्याची संधी त्यांना लाभली. इंदूर, ग्वाल्हेर, भोपाळ, जबलपूर, जालंदर, म्हैसूर, बंगलोर, जम्मू या शहरी पुढील काळात झालेल्या मैफलींनी मास्तर कृष्णराव यांचे नाव भारतभर झाले.

रंगभूमीवरील त्यांचे पदार्पण अनपेक्षित व अकल्पित मुळीच नव्हते. 'नाट्यकला प्रवर्तक' अर्थात श्री. करुणेश प्रासादिक मंडळीच्या 'संत सखू' नाटकात ते लहानपणीच विठ्ठलाची भूमिका करीत. परंतु भास्करबुवांकडे गाणे शिकल्यावर बडोद्याला मुक्काम असताना रंगभूमीवर महत्त्वाची भूमिका करण्याचा त्यांना अचानक योग आला !

गंधर्व नाटकमंडळीला सयाजीराव महाराजांचा आशीर्वाद होता. सालीना पाच हजार रुपये ते कंपनीला देत. बडोद्यात 'शारदे'च्या तालमी चालू असतानाच बालगंधर्वांच्या खांद्यावर पडदा पडला. तेव्हा शारदेचे काम कोण करणार? असा प्रश्न निर्माण झाला. भास्करबुवांसमवेत कृष्णरावांचा मुक्काम तिथंच होता. 'कृष्णानंच हे काम करावं' असा सर्वांचा आग्रह झाल्यावर भास्करबुवांनी परवानगी दिली. देवल तालमी घेऊ लागले व थोड्याच दिवसात बारीकसारीक लकबींसह देवलांनी कृष्णरावांकडून 'शारदा' तयार करून घेतली. अखेरीस सयाजीराव महाराजांपुढे हा प्रयोग झाला. तो खूपच यशस्वी ठरला. आजारी असतानाही बालगंधर्वांनी त्यावेळी केवळ नटीची साधीसुधी भूमिका वठविली.

बुवांना गंधर्व नाटकमंडळीसंबंधी खूपच जिव्हाळा होता. त्यांच्याच सल्ल्यानुसार कृष्णराव 'गंधर्व कंपनी'त शिरले. आणि कृष्णरावांचं खऱ्या अर्थाने रंगभूमीवर पदार्पण झालं. 'शारदा,' 'सौभद्र,' 'विद्याहरण,' 'स्वयंवर,' 'एकच प्याला,' अशा कितीतरी नाटकात मास्तरांनी बालगंधर्वांबरोबर कामं केली. १९१५ ते १९३३ ही अठरा वर्षे त्यांनी गंधर्व मंडळीत घालवली.

गंधर्व मंडळीतून मास्तर मोकळे झाले; त्याच सुमारास व्ही. शांताराम यांनी 'कृष्णराव 'प्रभात'मध्ये येण्यास राजी आहेत का?' अशी विचारणा केली. मास्तरांनी होकार दिला. 'धर्मात्मा'चे संगीत दिग्दर्शन त्यांच्यावर सोपविण्यात आले. प्रमुख भूमिका बालगंधर्वांची. बालगंधर्वांच्या गाण्यासाठी साथ करण्याकरिता थिरकवा, कादरबक्ष, हरिभाऊ देशपांडे ही सर्वच मंडळी आली. थोडक्यात, सर्व गंधर्व मंडळीच 'प्रभात'मध्ये सामील झाली.

'प्रभात'मधील वास्तव्यात मास्तरांनी 'धर्मात्मा,' 'अमरज्योती,' 'वहाँ,' 'गोपाळकृष्ण,' 'माणूस,' 'शेजारी,' 'लाखाराणी' या चित्रपटांना संगीत दिले. त्यापैकी 'धर्मात्मा', 'माणूस' व 'शेजारी' हे चित्रपट हिंदीतही निघाले. संगीत-दिग्दर्शक म्हणून मास्तरांचे नाव भारतभर गाजले. 'गोपाळकृष्ण,' 'माणूस' आणि 'शेजारी' हे आपले अतिशय आवडते चित्रपट असल्याचे मास्तर सांगत.

'प्रभात'मध्ये फूट पडल्यानंतर व्ही. शांताराम यांनी 'राजकमल'ची स्थापना केली. 'भक्तीचा मळा' या चित्राचे संगीत व प्रमुख भूमिका मास्तरांनीच केली. १९४४-४५ साली कोल्हापूरला 'मेरी अमानत' या चित्राला संगीत देण्यासाठी मास्तरांना पाचारण करण्यात आले. त्यात श्रीधरपंतांची प्रमुख भूमिकाही त्यांनी केली.

कालांतराने 'माणिक स्टुडिओज्' ही संस्था पुण्यात त्यावेळी चांगलेच मूळ धरू लागली होती. 'कीचक वध' व त्यानंतर 'विठू माझा लेकुरवाळा' या दोन चित्रपटांना संगीत दिल्यानंतर मास्तरांचे चित्रपटातील जीवन संपुष्टात आलं. कीचकवधातील 'धुंद मधुमती रात रे' व 'स्वयंवराची तिच्या घोषणा द्रुपदाने केली' ही लता मंगेशकरनं गायिलेली गीतं आजही सर्वतोमुखी आहेत.

स्वस्थ बसणे हा मास्तरांचा स्वभावच नव्हता. त्यांनी मध्येच 'वंदेमातरम्'ची चळवळ हाती घेतली. नेहरू, पटेल, राजेन्द्रबाबू यांची भेट घेऊन 'वंदेमातरम्'ला राष्ट्रगीताचा दर्जा मिळावा, अशी त्यांनी खटपट केली. पण ती व्यर्थ ठरली. 'वंदेमातरम्' हे सामूहिकरीत्या कसे बसवता

येईल हे सिद्ध करण्यासाठी त्यांनी स्वतःच्याच आवाजात एक ध्वनि-मुद्रिकाही काढली होती.

चित्रपट, रंगभूमी या मोहमयी वातावरणात राहूनही आपण सर्व व्यसनांपासून अलिप्त राहिलो, हे मास्तर कृष्णराव अगदी अभिमानाने मला सांगायचे. आणि पुन्हा याचे श्रेय आपले गुरुजी भास्करबुवा बखले यांना ते द्यावयाचे. गायनाच्या कार्यक्रमासाठी महिनोन् महिने बाहेर असले तरी त्यांनी आपला शिस्तबद्ध कार्यक्रम कधीच सोडला नाही.

'ऑल इंडिया पीस कमिटी'ने १९५३ साली चीनला एक सांस्कृतिक शिष्टमंडळ पाठविले होते, त्यात मास्तर कृष्णराव यांच्याबरोबरच हिराबाई बडोदेकर, सौ. ज्योत्स्ना भोळे, मधुकर गोळवलकर, महादेव इंदुरकर, विलायतखाँ, दमयंती जोशी इत्यादिकांचा समावेश होता. चौ एन लाय, माओ-त्से तुंग व अन्य चिनी नेत्यांशी बातचीत करण्याची त्यांना या दौऱ्यात संधी मिळाली. याही दौऱ्यात मास्तरांनी आपला पीळ कायमच ठेवला होता. मास्तर संपूर्णपणे शाकाहारी. दौऱ्यात खाण्याची अडचण होईल, म्हणून त्यांच्या पत्नीने त्यांना महिनाभर पुरेल एवढे मूगदळाचे लाडू, लोणचे, लसणीची खमंग चटणी असा भरगच्च डबा बांधून दिला होता. ( बरोबर पान-तंबाखू-पण होती ! )

मास्तरांजवळ चीजांचा एवढा मोठा संग्रह असतांना त्यांनी तो आपल्या शिष्यांना का दिला नाही ? भास्करबुवांना जशी शिष्यपरंपरा लाभली, तशी ती मास्तरांना का लाभली नाही ? यासंबंधी बरेच प्रवाद आहेत. मास्तरांना त्या संबंधी विचारावे का विचारू नये असे माझ्या मनात द्वंद्व चालू होते.

एके दिवशी मास्तरांचा मूड फारच छान होता. पानाचा डबा काढून मास्तरांनी पान लावले. तोंडात तंबाखूचा जर्दा टाकला. आणि झकासपैकी पान जमून झाल्यावर ते स्वतःशीच गुणगुणू लागले. तेवढ्यात मी माझा वरील प्रश्न त्यांना टाकला. या प्रश्नाने मास्तर रागावतील असे वाटले होते. पण घडले वेगळेच.

ते म्हणाले— ' हे बघ, गुरुकडून विद्या शिकण्यासाठी मी काय कष्ट सोसले हे तुला सांगितलेच. आज अशी किती जणांची तयारी आहे ? जुन्या काळाप्रमाणे शिष्याने गुरुच्या घरी धोतरे बडवावीत व पाणी भरावे असे मी मुळीच म्हणत नाही. परंतु ठरवून दिलेली मेहनत, रियाझ हे तर मनापासून केले पाहिजे ना ! आज हे कुणालाच नको आहे. झटपट रंगारी व्हायला हवं. माझ्या लेखी हे नाही.'

आमचे बोलणे चालू होते, एवढ्यात पं. राम मराठे आले.

मास्तरांच्या पायाला हात लावून त्यांनी नमस्कार केला. मास्तरांनीही राम मराठ्यांच्या पाठीवरून हात फिरविला. चैतन्याचं वातावरण निर्माण झालं. दोघांच्या दिलखुलास गप्पा झाल्या. काही वेळाने राम मराठे मास्तरांचा निरोप घेऊन गेले. ते गेल्यावर मास्तर माझ्याकडे वळून म्हणाले— ' माझी शिष्यपरंपरा नाही, असं जे म्हणतात त्याला राम हे एकच उत्तर आहे. भाराभर शिष्य करण्यापेक्षा हा एक आहे तेवढा पुरे '....

मास्तर वागण्यात अतिशय रोखठोक व व्यवहारी होते. ' नाटक कंपनीत राहूनही मी हाती धन राखू शकलो ' हे ते वारंवार मला सांगत. एकदा तर त्यांनी मला सर्व मिळकतीची आकडेवारीच सांगितली. गायनाचे कार्यक्रम किती झाले, त्यात किती पैसे मिळाले, संस्थानिकांनी किती भेटी दिल्या, नाटकाचे प्रयोग किती, कुठे झाले; याची नोंद ते ठेवीत. पत्नीची हौस म्हणून तिला केलेल्या दागिन्यांची जंत्रीही त्यांनी दिली. मास्तर डायरी ठेवत. या डायरीत त्यांनी हा सर्व तपशील समग्रपणे ठेवलेला होता.

एखादेवेळी कळत–नकळत मास्तर बालगंधर्वांशी आपली तुलना करीत. अखेरच्या काळात बालगंधर्वांना भेटण्याचा मला योग आला होता. रंगभूमीवर व खुद्द जीवनात अपार वैभवाचे दिवस घालविलेल्या बालगंधर्वांना मी अखेरीस विकलांग व निष्कांचन अवस्थेत पाहिले. तथापि त्यातही समाधानाची छटा होती. विषाद, विखार नव्हता. ' सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ । हे तुम्हाला जमवून कसे घेता येते ? ' असा मी बालगंधर्वांना प्रश्न केल्यावर ते म्हणाले होते, ' भजन होण्यापूर्वी मी ज्ञानोबारायांच्या अभंगाची भैरवी म्हणतो. ती अशी— हेचि मागतो मी आता, परिणाम गोड व्हावा, मागे जन वाखाणती, म्हणती पुण्याचा ठेवा । माझ्या जीवनाचे हेच सार आहे.'

मास्तरांना एका भेटीत मी बालगंधर्वांशी बोलण्यात आलेल्या मुलाखतीची ही आठवण सांगितली. त्यांच्या डोळ्यांत पाणी आलं. ते म्हणाले, ' तुलना कुणाचीच करू नये. नारायणराव ते नारायणराव, त्यांची सर कुणालाही येणार नाही. पण एक आहे. नारायणरावांची वृत्ती तुकारामासारखी होती. उदार. मी मात्र एकनाथासारखा व्यवहारी, संसारी झालो. म्हणून तर हे कृतार्थ जीवन जगत आहे.'

आणि एका नव्हे अनेक अर्थांने ते खरे आहे. कृष्णरावांचे जीवन कृतार्थतेत गेले. त्यांनी नट म्हणून रंगभूमी गाजवली. गायक म्हणून मैफिली गाजवल्या. चित्रपट संगीतातही ते यशस्वी ठरले. देशभर भ्रमण केले. परदेशात जाण्याची संधी मिळाली. महात्मा गांधी, पं. नेहरू, सुभाषचंद्र बोस, सरदार पटेल, सरोजिनी नायडू इत्यादी नेत्यांच्या

सहवासात काही क्षण घालवता आले. उत्तरायुष्यात शासकीय व सार्वजनिक मानसन्मान आले.... पद्मभूषण किताब त्यांना मिळाला. संगीत नाटक अकादमीने त्यांचा बहुमान केला. मागच्याच वर्षी त्यांचा अमृत महोत्सवही थाटात साजरा झाला. मास्तरांचे सारे आयुष्य कृतार्थतेत गेले.

जवळजवळ चार-पाच महिने मी मास्तरांच्या कृतार्थ जीवनाचा शोध घेण्याचा प्रयत्न करीत होतो. मास्तर दिलखुलासपणानं, रसिकतेनं गत आठवणींना उजाळा देत होते. त्यांची मी टिपणं करीत होतो.

या टिपणाद्वारे मी लेखन करी. ' महाराष्ट्र टाइम्स 'च्या साप्ताहिक आवृत्तीत लेख-रूपानं ह्या आठवणी क्रमशः प्रसिद्ध होणार असल्यानं मास्तरांच्या घरी सातत्यानं जाणं, गप्पा-गोष्टी करणं, त्यांचे विनोद ऐकणं यात आनंदाचा काळ जात होता. या टिपणांवरून मूळ तपशील न हरवता शैलीदार लिखाण करणं ही एक कसोटी होती. दैनंदिन बातमीदारी करून या सर्व गोष्टी साकार झाल्या.... अंतःस्फूर्तीच्या प्रेरणेनं आणि मास्तरांच्या रसिक उदारतेनं.

या आठवणी ' महाराष्ट्र टाइम्स 'मध्ये प्रसिद्ध होऊ लागल्या आणि मास्तरांचे हृदय आनंदानं भरून आलं. कृतार्थतेबरोबरच कृतज्ञताही होती.

सदाशिव पेठेतील लिमयेवाडीत माझा अखंड संचार असायचा. प्रा. श्री. के. क्षीरसागर, कविवर्य शांताराम आठवले, प्रा. रा. वि. ओतुरकर, गोपीनाथ तळवलकर, डॉ. ग. श्री. खैर यांची बैठक आठवड्यातून दोन-तीनदा तरी प्रिं. नी. व. ऊर्फ बापूसाहेब किंकर यांच्या निवासस्थानी होत असे. मधून मधून प्रा. ग. वि. अकोलकर, डॉ. वा. रा. ढमढेरे हेही या बैठकीत सामील होत. मी लिहिलेल्या मास्तरांच्या अनेक आठवणींचे या गुरुवर्य मंडळींपुढे बऱ्याच वेळा वाचन होई. ' प्रभात फिल्म कंपनी'च्या संदर्भात मास्तरांनी ज्या आठवणी सांगितल्या होत्या, त्याला शांताराम आठवले यांनी दुजोरा तर दिलाच, पण त्यात भरही घातली ! साहित्य, शिक्षण, समाज, राजकारण, कला या क्षेत्रातील अनेकविध मंडळींचा मला घनिष्ठ सहवास लाभला हे माझे फार मोठे भाग्य !

श्री. पु. ल. देशपांडे यांची दाद तर सतत मिळत गेली. ' महाराष्ट्र टाइम्स 'चे संपादक श्री. गोविंद तळवलकर, सहसंपादक श्री. दि. वि. गोखले, श्री. भालचंद्र वैद्य व श्री. दिनकर गांगल यांनी उत्तम साथ दिली. त्यांचे मनःपूर्वक आभार. या मंडळींमुळेच ' संगीतकलानिधी 'च्या जीवनाची झलक रसिकांना सादर करता आली.

या आठवणींना ‘ बोला अमृत बोला ’ हे सार्थ नाव संगीत-समीक्षक श्री. अनंत बेडेकर यांनी सुचविले.

मास्तरांचे चिरंजीव श्री. राजाभाऊ फुलंब्रीकर व सौ. फुलंब्रीकर यांच्या सहकार्याचा उल्लेख आवर्जून करावा लागेल.

**सुधाकर अनवलीकर**

धुळ्याच्या कमिन्स क्लबमध्ये १९११ साली— म्हणजे वयाच्या अवघ्या तेराव्या वर्षी— गायनाची असामान्य मैफिल गाजविल्यानंतर पुण्याच्या किर्लोस्कर थिएटरात कृष्णाचा सत्कार करून त्याला सुवर्णपदक बहाल करण्यात आले. (छायाचित्र श्री. के. टी. देशमुख यांच्या सौजन्याने)





पेकिंगमधील भारतीय शिष्टमंडळातील कलावंतांचा कार्यक्रम सुरू होण्यापूर्वी मा. कृष्णराव यांच्या नेतृत्वाखाली प्रथम ' वंदेमातरम् ' म्हणण्यात आले. मास्तरांच्या डाव्या बाजूला हिराबाई बडोदेकर, दमयंती जोशी व उजव्या बाजूला सौ. ज्योत्स्ना भोळे दिसत आहेत.

' प्रभात ' फिल्म कंपनीत चित्रिकरण झाल्यानंतर
गप्पा–गोष्टीत मनमुराद रंगलेले
श्री. अवधूत, मा. कृष्णराव व श्री. राजा नेने.



मा. कृष्णराव :
एका स्त्री–भूमिकेत

स्त्री भूमिकात काही काळ मा. कृष्णराव गाजले. ही लोकप्रियता लक्षात घेऊन त्यावेळी पोस्ट–कार्डेही काढली होती.

## ब़ाल गवई मास्तर कृष्णा,

(कि. भा. गा. समाज.)





मुरलिस्वन तो गोप गणा,
कीं वीणारव त्या हरिणा,
कृष्णा, कोमल कंठें तैसा,
मन फुलविती तव ताना!
वय चवदाचें कोमल देतें,
स्मृति जानकितनयाची!
सच्छिष्यीं तें दान हि गातें,
महती भास्कर गुरुची!!
कांचनपदका मिळवुनि,
तैशी पदवि बालगवयाची,
धुलियानगरीं, कीर्ति गाइली
गुरुच्या कौशल्याची!
फुलतें तेथें मावळतेंही
गानफूल गवयांचें!
परि फल धरितें भास्करसुम हें
मोदवितें मन कविचें!!

धुळे येथे बालवयातच मैफिल गाजवल्यानंतर या बाल-गायकाचे कौतुक म्हणून 'चित्रमयजगत' मासिकात त्याचे छायाचित्र व त्या सोबत गौरवपूर्ण कविताही प्रसिद्ध झाली. छायाचित्र श्री. के. टी. देशमुख यांच्या सौजन्याने.

'मेरी अमानत' या हिंदी चित्रपटातील श्रीधरपंतांच्या भूमिकेत मा. कृष्णराव



' सौभद्र 'मधील कृष्णाच्या भूमिकेत मा. कृष्णराव.

' राजकमल 'च्या ' भक्तीचा मळा ' ( हिंदी ' माली ' ) चित्रपटांत सावता माळीच्या भूमिकेत मा. कृष्णराव.

‘ प्रभात ’च्या ‘ शेजारी ’ या चित्रपटाचे चित्रिकरण चालू असतांना कांही क्षण विनोदातही पार पडत. अशाच एका प्रसंगी एकतारी उगारून नटवर्य केशवराव दाते ‘ ॲक्शन ’ घेत आहेत तर मा. कृष्णराव त्यांना ‘ सबुरी ’चा सल्ला देत आहेत.

‘ इंडियन स्टेट्स ब्रॉडकास्टिंग सर्व्हिसेस ’च्या अपोलो बंदर, मुंबई येथील स्टुडिओत ५ जानेवारी १९३२ रोजी शास्त्रीय कार्यक्रम सादर करताना मा. कृष्णराव.



‘ शेजारी ’ चित्रपटाच्या वेळी संगीत दिग्दर्शक मा. कृष्णराव नटवर्य केशवराव दाते यांना संगीताचे ‘ प्राथमिक धडे ’ देत असतांना.



## ॥ १ ॥

### बोला, अमृत बोला- !

' बापू, तुझी नेहमीचीच धांदल असते. जन्मवेळेपासून ही धांदल आहे. कारण तुझा जन्म झाला ती वेळ संध्याकाळची. गाई-गुरे रानातून घरी येण्याची. गाईची धार काढायची ! श्रीमंदिरातील सांज-आरतीची वेळ तू गाठलीस. ' माझी आई नेहमी मला असे गंमतीने म्हणायची.

माझा जन्म माझ्या आजोळी - ज्ञानदेवाची आळंदी या पवित्र तीर्थक्षेत्री पौष वद्य चतुर्दशी शके १८१९, शुक्रवार दिनांक २१ जानेवारी १८९७ रोजी सायंकाळी दिवे लागणीच्या सुमारास झाला.

माझ्या आजोळचे नाव नेर्लेकर. आजोबांना मी कधीच पाहिले नाही. आजीचे नाव राधाबाई. आळंदीजवळच केळगाव येथे तिची थोडीशी जमीन होती. तिच्या एकटीच्या उदरनिर्वाहापुरते तिला साधन होते, घरची गाय असल्यामुळे दूधही भरपूर मिळायचे. माझे मामा शंकरराव तालीमबाज असल्यामुळे त्यांचा दुधाचा आहार जास्त असे. माझी आई तिच्या आईची एकटीच मुलगी; तिचे नाव मथुराबाई.

माझी आई माझ्या बालपणापासून वरचेवर आळंदीला जात असे. वसुदेवाने ज्याप्रमाणे श्रीकृष्णाला एका पाटीत घालून डोक्यावरून नेले, त्याप्रमाणे माझी आईसुद्धा मला पाटीत घालून ती डोक्यावर ठेवून आळंदीला पायी जात असे. पुढे मी मोठा झाल्यावर आई मला पाठुंगळी

बांधून आळंदीची वाटचाल करीत असे.

माझे घराणे मूळचे वेदाध्ययन आणि भिक्षुकी करणारे. गणेश नारायण फुलंब्रीकर ( पाठक ) हे माझ्या वडिलांचे नाव. आमचे मूळचे गाव फुलंब्री. ते औरंगाबादपासून अजिंठ्याच्या रस्त्यावर तेरा मैलांवर आहे. आमच्या घराची मूळची परिस्थिती चांगलीच होती. आमच्या घराण्यातील काही पूर्वज वेदपठण करणारे होते, म्हणून आमचे उपनाव पाठक असे पडले.

पाठकांचे फुलंब्रीकर कसे झाले याची हकीकत मनोरंजक आहे. माझ्या पूर्वजांपैकी एक जण वेदमूर्ती होते. पुण्याला पर्वती येथे ते श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्याकडे आले. त्यावेळी पर्वती येथे एक ‘ रमणा ’भरत असे; आणि तेथे पेशवे सरकार विद्वान ब्राह्मणांना दक्षिणा देत असत. वेदमूर्तीही दक्षिणेसाठी तेथे आले. परंतु रमण्याची वेळ संपून गेली होती, म्हणून पेशवे सरकार पर्वतीवर मुक्कामास गेले होते.

आपण इतक्या दूर अंतरावर आलो नि आपली व श्रीमंत पेशवे सरकारांची भेट झाली नाही, याची चुटचुट त्यांना फार लागली. म्हणून ते पर्वतीवर गेले व तेथील पहारेकऱ्याला श्रीमंतांची भेट करवून देण्याबद्दल विनंती करू लागले. पहारेकऱ्याने त्यांची भेट घडविण्याची व्यवस्था केली. ती वेळ श्रीमंतांच्या भोजनाची होती; त्यामुळे श्रीमंतांनी वेदमूर्तींना भोजनासच बोलाविले आणि सर्व हकीकत मोठ्या आस्थेने विचारून घेतली व काही ऋचा म्हणण्याची विनंती केली. वेदमूर्तींनी संहितेतील काही ऋचा म्हणून दाखविल्या त्या ऐकून श्रीमंत खुष झाले. भोजन झाल्यावर एक शाल, श्रीफल आणि भरघोस दक्षिणा मिळाली. श्रीमंतस्वारीचा निरोप घेऊन वेदमूर्ती फुलंब्री मुक्कामी परतले, आणि ज्यांच्याकडे ते वेदविद्या शिकले त्यांच्याकडे ते गेले – सर्व दक्षिणा त्यांना अर्पण केली व म्हणाले, “ आपण दिलेल्या विद्येचा हा बहुमान आहे. तेव्हा आजपासून मी फुलंब्रीकर या नावाने ओळखला जाईन.’

—तेव्हापासून आमच्या घराण्याचे ‘फुलंब्रीकर’ हे उपनाव प्रचारात आले. माझ्या वडिलांनीसुद्धा वेदाध्ययन केले होते. त्यांचाही उदरनिर्वाह भिक्षुकीवरच चालत असे. भिक्षुकी बरी चालत असल्यामुळे त्यांनी सावकारीतही लक्ष घातले म्हणून थोडा फार धनसंचयही करता आला. आमची परिस्थितीही चांगली होती; पण ती फार काळ टिकली नाही.

तीर्थयात्रेला जाण्यासाठी माझे वडील निघाले असता आपल्या जवळचे दागदागिने-मालमत्ता रोजच्या बैठकीतील एका स्नेह्याकडे मोठ्या विश्वासाने त्यांनी ठेवली. चिठ्ठीचपाटी काहीही घेतली नाही. तीर्थयात्रेहून

परतल्यानंतर ते स्नेही निवर्तल्याची बातमी कळली, म्हणून वडिलांनी ठेवीबाबत चौकशी केली – परंतु स्नेह्याच्या नातेवाईकांनी कानावर हात ठेवला ! या घटनेचा फारच मोठा मानसिक आघात माझ्या वडिलांना सहन करावा लागला. गहाण ठेवलेले सोने, नाणे परत घेण्याची ताकदही त्यांच्यात उरली नाही. त्यामुळे त्यांना आपली दोन घरे विकावी लागली, आणि त्यातून लोकांची परतफेड करावी लागली. तेव्हापासून आम्हाला वाईट परिस्थितीची ग्रहदशा भोगावी लागली.

मला सावत्र आई होती. तिला लक्ष्मण नावाचा एक मुलगा होता. ती दोघेही कालवश झाली. माझी आई माझ्या वडिलांची द्वितीय पत्नी. तिचे लग्न वयाच्या नवव्या वर्षी झाले. आरंभीची तीन चार वर्षे तिने दागदागिन्यांचा उपभोग घेतला पण नंतर वरील घटनेमुळे परिस्थिती उलट झाली आणि गरिबी आमच्या नशिबी लागली. माझ्या आईला त्याचे फार दुःख वाटे. अशा विपन्नवस्थेतही परिस्थितीला धैर्याने तोंड देत, लोकांची मोलमजुरी करून तिने अनेक वर्षे काढली.

माझ्या आईला सात-आठ अपत्ये झाली. त्यापैकी चौघे भाऊ व एक बहीण राहिलो. मला दोघे वडील बंधू होते. सर्वांत थोरले बंधू विष्णुपंत ऊर्फ आण्णा. हे वयाच्या ऐंशी वर्षापर्यंत होते. ते आजीव ब्रह्मचारी राहिले. त्यानंतरचे दत्तोपंत ऊर्फ भाऊ. मग काही अपत्यांमागून नवसाने झालेला मी. माझ्या पाठीवर गंगू नावाची एक बहीण झाली. ती चांगली गोरीगोमटी होती. पण वयाच्या अकराव्या वर्षीच ती कालवश झाली. माझ्यानंतरचे धाकटे बंधू परशुराम. दोघे थोरले बंधू व बहीण माझ्या देखत हे जग सोडून गेली याचे फार दुःख वाटते. आता शेवटचे बंधू परशुराम व मी असे दोघेच आहोत.

माझे नाव कृष्णा ठेवण्यात आले. त्यामागे फार मोठा मनोरंजक इतिहास आहे. माझी कृष्णाताई उर्फ कुसाताई या नावाची मावशी होती. तिचे माझ्या आईवर अतिशय प्रेम होते. मावशी खूप आजारी झाली. आजाराने कंटाळून ती माझ्या आईला म्हणायची, ' तुझ्यासारखी बहीण पुन्हा मला मिळायची नाही. मी मरेन आणि पुन्हा तुझ्या पोटी जन्म घेईन.'

मध्यंतरी गेलेल्या अपत्यामुळे मुले जगावीत म्हणून माझ्या आईने नवस केला होता; आणि त्यानंतर माझा जन्म झाला. ' तू नवसाने झाला आहेस ' असे माझी आई मला नेहमी म्हणे.

माझे नाव ठेवण्यापूर्वी मी अतिशय रडत असे. आणि माझे रडे कसे थांबेल या विवंचनेत माझी आई होती. आपल्या बहिणीचे तिला स्मरण

झाले. आपली बहीणच आपल्या पोटी आली असे समजून तिने माझे नाव कृष्णा उर्फ कुशा ठेवले आणि नाव ठेवताच माझे रडे थांबले, असे माझी आई मला सांगायची. मी नवसाने झालो म्हणून माझे उजवे नाक टोचून त्यात सोन्याची सुकलीही अडकवली होती.

माझी मुंज होईपर्यंत मी माझ्या आजीला पाहिल्याचे मला अजून चांगले स्मरते. ती माझ्या मुंजीला पुण्यास आली होती. त्यावेळेस आम्ही जुन्या तपकीर गल्लीत खरे यांच्या वाड्यात राहात होतो. मध्यंतरी काही दिवस जाईलांच्या वाड्यात राहावयास गेलो. नंतर पुन्हा तपकीर गल्लीतील पहिल्याच जागी आलो.

हातात नुसती तपेली व अंगाखाद्यावर दागदागिने न घालता जेव्हा माझी आई खऱ्यांच्या वाड्यात आली त्यावेळी मालक खरे यांनी विचारले, ‘ हे काय मथुबाई, दागदागिने वगैरे कुठे आहेत ? ’

दागदागिन्यांचा डबा वगैरे सर्व गेल्याचे समजताच त्यांना फार वाईट वाटले. त्यांनी दरमहा दोन आणे भाड्याने आम्हाला एक खोली भाड्याने दिली.

काही कालानंतर माझे वडील स्वर्गवासी झाले; त्यावेळी माझे वय सहा वर्षांचे होते.

जुन्या तपकीर गल्लीत श्रीमंत फडके यांच्या वाड्यातील मागील उघड्या चौकात एका मोठ्या ओट्यावर खाजगी शाळा भरत होती. त्या शाळेत पंधरा वीस विद्यार्थी होते. या शाळेत मी शिकायला जात असे. पहिली मुळाक्षरे मी येथेच शिकलो. बसण्यासाठी घरून तरट किंवा मेणकापडाचा तुकडा घेऊन मी जात असे. ही शाळा फक्त सकाळीच भरत असे. फी काहीही नव्हती.

‘ नवीन मराठी शाळा ’ ( पूर्वीचा होळकरवाडा ) येथे माझे मराठी चार यत्तेपर्यंत शिक्षण झाले. गणित विषय माझा कच्चा असे. त्याची सगळी भर मी पुस्तकातील सर्व कविता उत्तम गळ्याने म्हणून भरून काढीत असे. कविता म्हणण्यात माझा पहिला नंबर असे. त्यावेळचे शिक्षक सर्वश्री देशपांडे, काळे, आंबर्डेकर हे पाणी पिण्याच्या व मधल्या सुटीत अनेक वेळा माझ्याकडून पदे म्हणवून घेत असत. बाकीचे विषय कच्चे; नापास होण्याचे हे कारण. मी शिक्षकांना म्हणालो, ‘ कवितेत मी पहिला नंबर मिळवतो व तुम्ही मला ऑफिसात गाणे म्हणायला सांगता. मग मला नापास का करता ? ’

तेव्हा एक मास्तर मला गमतीने म्हणाले, “ तू आणखी एक वर्ष चौथीत नापास झालास तर तुला आम्ही चौथ्या इयत्तेचा प्रमुख समजू. ”

मी त्याचा अर्थ समजलो. प्रमुख म्हणजे शाळेचा फळा पुसणे, खडू इत्यादी सामान सांभाळणे. हेच काम माझ्याकडे येणार की काय अशी मला शंका आली.

—परंतु तशी वेळ आलीच नाही !

शिक्षणात माझे लक्ष नव्हते. पण गाण्यात मात्र प्रगती होती. नाटकातील पदे ऐकून अगदी बरोबर तशी म्हणून मी दाखवायचा. विशेषतः " सौभद्र " नाटकातील नारदाची पदे मी चांगली म्हणत असे. ' लग्नाला जातो मी ' ' पावना वामना, या मना ' ही आवडीची पदे होती. आवाजही चांगला, मधुर होता. कोणाचे गाणे ऐकले की, त्याची नक्कलही मी हुबेहूब करीत असे.

गळा गोड आणि घरची परिस्थिती गरीबीची. मार्ग निघत नव्हता.

माझ्या वडिलांनी नाट्यकलाप्रवर्तक कंपनीची काही नाटके पाहिली होती. थोरले बंधू दत्तूभाऊंनीही नाटके पाहिली होती. मला ते नाटकासही बरोबर घेऊन जात. ' सौभद्र ' नाटक मी पाहिले. पण त्यातील माझ्या बुद्धीला आकलन झाली ती नारदाची पदे व तीच माझ्या चांगल्या लक्षात राहिली.

शाळेत माझ्या वाट्याला चौथीचा वर्गच राहिला हे पाहून वडील बंधूंनी विचार केला, की कृष्णाला शिक्षण देण्यात काही अर्थ नाही. कारण हा हमखास पास होणे कठीण. या गतीने हा वयाच्या ४० व्या वर्षी मॅट्रिक होईल, असे वाटते. गाण्यात याचे लक्ष आहे; तर काय करावे ? त्या वेळी नाट्यकलाप्रवर्तक मंडळीचे एक ' बोर्ड ' असे. त्यातील मंडळी पुण्यातील आणि प्रतिष्ठित होती. त्यांपैकी काहींच्या घरी माझी आई कामधंद्यासाठी जात असे. मथुबाईचा मुलगा कुशा गातो हे त्यातील काही जणांना माहिती होते. तेव्हा त्याला आपल्या कंपनीत घ्यावे अशी बोर्डातील लोकांची इच्छा होती. त्यानुसार माझ्या आईला व दत्तोपंतांना विचारलेही होते. कंपनीतील मंडळी आदरणीय व धार्मिक भावनेची होती. श्री. गोपाळराव मराठे, श्री. वासुदेवराव पटवर्धन, श्री. माधवराव केळकर, ही मंडळीही बोर्डात होती. केशवराव नगरकर, दामुअण्णा नगरकर, विष्णुपंत साठे, बाबूराव रानडे अशांनी मला कंपनीच्या मालकांकडे नेले. त्यांनी माझे गाणे ऐकले.

त्यावेळी कंपनीत श्री. रामभाऊ कुंदगोळकर ( सवाई गंधर्व ) हे नायिकेचे काम करीत असत. त्यांच्याकडून शिकण्याचा लाभ मिळेल आणि मलाही गाण्याचे अंग आहे ही गोष्ट माझ्या आईला व बंधूंना पटली आणि मला नाट्यकलाप्रवर्तक मंडळीत ठेवण्यात आले. तेव्हा मी दहा वर्षांचा होतो.

सुरुवातीस मी नाचामध्ये काम करी. नंतर ‘ प्रभावती ’ नाटकात पृथ्वीसिंगाच्या सिंहासनामागे चवरी फिरवण्याचे काम असे. त्यावेळी सुरवार, छोटा अंगरखा व मराठेशाही पगडी घालून मी हे काम करी.

‘ वेणीसंहार ’ नाटकात ‘ ड्रेस ’ करून राक्षसाच्या प्रवेशात मी ‘ राक्षस ’ म्हणून स्टेजवर बागडत असे. पुढे ‘ शारदा ’ नाटकात गौरीच्या हळदी-कुंकवाच्या प्रवेशात मला जान्हवीचे काम मिळाले. त्यावेळी मी एक पदसुद्धा गायले. त्यानंतर पुढे त्याच नाटकात ‘ हिम नग जो पाषाण हृदयी, तो प्रसवे कन्या गौरीला ’ हे आणखी एक पद गायला मिळाले.

त्याच सुमारास किर्लोस्कर कंपनीचे ‘ मानापमान ’ नाटक पाहाण्यास माझ्या बंधूंनी मला नेले. ‘ हा टकमक पाही सूर्य रजनीमुख ’ हे पद माझ्या विशेष लक्षात राहिले. या पदाची चालही चांगली होती. ती चाल मी ‘ हिमनग जो पाषाण हृदयी ’ या पदाला लावली; आणि ते नाटकात म्हटले. प्रेक्षकांना ते विलक्षण आवडले आणि त्या गाण्याला ‘ वन्समोअर ’ मिळाला. कंपनीचे मालक चकितच झाले. त्यांना खूपच आनंद झाला. त्याप्रित्यर्थ त्यांनी मला एक रुपया बक्षीस दिला. स्वतंत्र चाली-रचना करण्याची ही बारीकशी सुरुवात म्हणाना; कारण चालीचे मीटर, शब्द ताल वजनात बरोबर पडतात की नाही याकडे लक्ष द्यावे लागे आणि त्याप्रमाणे पुढे हळूहळू मला ते जमले.

नाट्य-कलाप्रवर्तक मंडळीचा मुक्काम एकदा अहमदनगर येथे असताना कंपनीच्या मालकांबरोबर शिर्डी मुक्कामी श्री सद्गुरू साईबाबांच्य दर्शनास जाण्याचा योग आला. त्या दिवशी आणखीही काही प्रतिष्ठित मंडळी तेथे आली होती. त्या ठिकाणीच भोजनाचा घाट होता. साधारणपणे शंभरएक मंडळी पंक्तीला असावीत. मी बाबांच्या पाया पडलो. हा गाणारा मुलगा आहे, असे बाबांना सांगण्यात आले. ते म्हणाले, ‘ भोजनको बैठो ’– सर्व पगंत सोवळ्याची असल्याने मला एक सोवळ्याची लंगोटी नेसण्यास दिली. जेवण जिलेबीचे होते. स्वयंपाक रुचकर झाला होता, कारण हा बाबांचा प्रसाद आहे, अशी लोकांची भावना होती. बाबा स्वतः पंक्तीत हिंडून ‘ सावकाश जेवा ’ म्हणून सांगत होते.

कंपनीच्या मालकांनी श्लोक म्हटले व मलाही म्हणावयास लावले. बाबा खुष झाले. अशा प्रकारे साईबाबांना प्रत्यक्ष पाहाण्याचा आणि दर्शन व प्रसाद घेण्याचा योग आला हे मी माझे भाग्य समजतो. बाबांची झोपडी, त्यांचे रहाणे, पत्र्याचा मंडप सर्व काही अद्यापही मला पूर्णपणे स्मरते !

नाट्यकलाप्रवर्तक मंडळीचा पुण्यातील मुक्काम कसबा पेठेतील कासारदेवीच्या धर्मशाळेत असे. त्याच ठिकाणी ग्वाल्हेरचे निसार हुसेनखाँ

साहेब हे उतरत असत. खाँसाहेब उंचेपुरे व अंगाने धिप्पाड होते. अत्यंत लहरी परंतु अगदी फकीरी वृत्तीने ते रहात. अंगात लांबलचक कफनीवजा सदरा व डोक्याला पांढरी पुरभय्या जरीची फितीची टोपी ते घालीत. रोज सकाळी चौकात स्नान करीत. स्नान करताना प्रत्येक तांब्या अंगावर ओतताना ते ओळीने 'गोपाळरावके कल्याण, माधवरावके कल्याण, वासुदेवरावजीके कल्याण' असे म्हणत असत. गोपाळराव मराठे, माधवराव केळकर आणि वासुदेवराव पटवर्धन हे कंपनीचे मालक होते.

जुम्मेकी रातला (गुरुवारी रात्री) ते शनिवार पेठेतील एका पिराला जात असत. तेथे ते धूप जाळत. धुपाचे भांडे माझ्या हाती देऊन 'चलो कृष्णा हमारे साथ' असे मला म्हणायचे. कधी कधी ते स्वतः नाटकातील नकली दागिने अंगावर घालीत व डोक्याला शिरपेचही लावीत.

निसार हुसेन खाँ कंपनीच्या मुक्कामी सकाळीच गायला बसत. आणि तिन्ही मालकांना संथा देत असत. त्यांना पैशाची अभिलाषा मुळीच नव्हती. आवाज पल्लेदार होता.

सणाच्या दिवशी कंपनीत किंवा अन्यत्र कोठे मेजवानी असली तर खाँसाहेबही जेवावयास येत असत. एकदा सदाशिव पेठेतील श्री. माधवराव केळकर यांच्या बागेत कंपनीला मेजवानी होती. त्यावेळी खाँसाहेबही आले होते. आमचे श्लोक म्हणून झाले की, खाँसाहेबही एखादा संस्कृत श्लोक म्हणत.

कंपनीतून ते आपल्या गावी गेले तेव्हा त्यांची एक लाकडी पेटी राहिली. तीमधील त्यांची इस्टेट कपड्यांची रंगीबेरंगी बटणे, सुई दोऱ्याची पाकिटे, दोऱ्याची रिळे इत्यादी सामान्य वस्तू होत्या. एकूण हा अवलियाच होता.

खाँसाहेब श्रेष्ठ दर्जाचे घरंदाज गायक होते. भूगंधर्व रहिमतखाँ यांचे हे चुलत घराणे. मला त्यांच्या गायनाचा श्रवणलाभ अनेक वेळा झाला. माझ्या गाण्यावर ते खूष असत.

नाट्यकला प्रवर्तक मंडळीचा "श्री करुगेश प्रासादिक" असा मथळा होता. गंधर्व कंपनीतही या अर्थाची एक तसबीर लावली जात असे. या तसबिरीत अण्णासाहेब किर्लोस्कर मध्यभागी असत. नाट्यकलाप्रवर्तक मंडळीत रोज रात्री 'पंचपदी' म्हटली जाई. तीत आम्ही मुलेसुद्धा भाग घेत असू. कंपनीचे मालकही त्यात सामील असत. कंपनीतील सर्व जण सोवळे नेसूनच जेवावयास बसत. मीही कंपनीचाच 'मालक' असल्याने मला चार रुपयांचा तागाचा मुकटा देण्यात आला होता. कंपनीत मला पगार नसे. मी जेवणावारी नाटकात कामे करी. ज्याला पगार नसे त्याला

'मालक' म्हणत. अशी 'मालकी' सुमारे दोन वर्षे मी भोगली. कुणी विचारले, 'काय रे तुला पगार किती ?'

मी ऐटीने उत्तर देई – 'मी मालक आहे !'

'संत सखू' नाटकात मी विठ्ठलाचे काम करीत असे व त्यावेळी माझ्या 'भक्तजन सदा' या पदाला चार चार वेळा 'वन्स मोअर' मिळे. मालक मंडळी प्रत्येक वन्समोअर मागे एक याप्रमाणे रॉसबेरी पिण्यास देत. रॉसबेरी मला आवडायची. पण मिळणाऱ्या 'वन्स मोअर'च्या प्रमाणात रॉसबेरी पचवण्याची माझी ताकद नव्हती–आणि वयही नव्हते. कधी कधी या पदाबद्दल मला रुपया बक्षीस मिळायचा.

'विठोबा' म्हणून मी गरुडावर बसून स्टेजवर यायचा. त्यावेळी गॅलरीतील भाविक स्त्रिया मला 'जय विठोबा, जय पांडुरंगा' म्हणून माझ्याकडे पैसे टाकत. स्टेजवर सुमारे तीन चार आण्यांचा खुर्दा जमायचा. अंक संपल्यावर तोच 'विठोबा' पैसे गोळा करण्यासाठी स्टेजवर यायचा. नाटकाच्या प्रयोगाला असे पैसे जमायचे; तोच मी माझा पगार समजत असे.

एकदा पुण्यातील विजयानंद थिएटरात 'संत सखू' लागले होते. त्याला गायनाचार्य पंडित भास्करबुवा बखले आणि बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर हे आले होते. त्यांनी माझी पदे ऐकली. त्यादिवशी तर विलक्षण रंग भरला होता. मी बागेश्री, मालकंस व इतरही रागांचे मिश्रण करून 'भक्त जन सदा' हे पद विविध छटांतून म्हणून दाखवले. विविध छटातून पद पुन्हा मूळच्या चालीवर यायचे. 'कृष्णा म्हणजे मांजर आहे. इतके राग घालतो. पण कुठेही उडी मारली तरी मांजर जसे चार पायांवर उभे राहाते, तसे याचे गाणे पुन्हा मूळ चालीवर' असे ते म्हणाले.

नाटक संपल्यावर मी भास्करबुवांना नमस्कार केला. ते म्हणाले, 'गाणे शिकला तर हा मुलगा मोठा गायक होईल.' हे शब्द माझ्या कानात कितीतरी दिवस घुमत होते.

आणि पुढे काही दिवसांनी मी नाट्यकलाप्रवर्तक सोडण्याचे ठरविले. त्यावेळी पहाटे चार वाजता एक पॅसेंजर गाडी मुंबईहून पुण्याला जाण्यास निघत असे. त्या गाडीने पुण्याला येण्यास मी निघालो. मला गाडीत बसविण्यासाठी थोरल्या बंधूचे स्नेही हल्लीचे प्रसिद्ध विनोदी लेखक गोपूनाना (गो. गं.) लिमये व डॉक्टर नाशिककर स्टेशनवर आले होते. सकाळी दहा-अकराच्या सुमारास मी पुण्यास पोहोचलो. ते साल दहा किंवा अकराचे असावे. पुण्यात प्लेगची साथ असल्यामुळे बरेचसे लोक गावाबाहेर चतुःशृंगीच्या मोकळ्या मैदानात झोपड्या बांधून राहात. गरीब

लोकांकरिताही काही झोपड्या बांधल्या होत्या. त्यात माझी आई व कुटुंबीय राहात; तेथे मी गेलो.

कंपनी सोडून मी आलो, ही हकीकत दुसऱ्या दिवशी सकाळी मालक मंडळींना कळली. कंपनीच्या बोर्डातील काही लोक माझ्या आईला म्हणाले, ‘ याने कंपनी का सोडली ? ’

तिथे त्याचे गायनाचे काहीही शिक्षण होत नाही, म्हणून तो निघून आला आहे असे माझ्या आईने सांगितले.

रामभाऊ कुंदगोळकर ऊर्फ सवाई गंधर्व यांनीही माझ्या थोरल्या बंधूंना सांगितले की, नाटकात राहून कृष्णाचे गाणे होणार नाही. मलाही शिकवण्यासाठी तितकासा वेळ मिळणे कठीण, तेव्हा त्याला गाणे शिकवण्यासाठी पंडित भास्करबुवा बखले किंवा अब्दुल करीम खाँ साहेब यांच्याकडे ठेवावे, हे उत्तम. माझे नाटकातील काम व गाणे पाहून भास्करबुवा खूष झालेच होते; ते माझ्या स्मरणात होते.

शनिवार पेठेत एक मोठे घर होते. त्याचा आता नामनिर्देशही राहिला नाही. सर्व बदल झाला आहे. पण त्या घरात अब्दुल करीमखाँसाहेब राहात होते.

मुंजीत मिळालेला अंगरखा व जरीची टोपी घालून मी गेलो. वेळ संध्याकाळची वेळ होती, म्हणून मी ‘ पुनरपि नयना ’ हे पद गायलो.

‘ रामभाऊ कुंदगोळकर यांनी सांगितले, म्हणून कृष्णाला घेऊन मी आपणाकडे आलो आहे. ’ असे माझ्या बंधूंनी खाँसाहेबांना सांगितले.

‘ गळा गोड आहे. हा गातोसुद्धा हुशारीने. मी याला शिकवीन. पण दोन अटी आहेत. एक म्हणजे नऊ वर्षांचा बाँड लिहून द्यावा लागेल. आणि दुसरी अट म्हणजे शिकून तयार झाल्यावर गुरुदक्षिणा म्हणून एक हजार रुपये मला द्यावेत. आपण गरीब आहात, तेव्हा तूर्त काहीही घेणार नाही...’ असे खांसाहेबांनी सांगितले.

नऊ वर्षांची अट बंधूंना व घरच्या मंडळींना पटली. पण शिकून झाल्यावर एक हजार रुपये द्यायची ही गोष्ट त्यावेळच्या परिस्थितीत शक्य नव्हती. नऊ वर्षांनंतर ही दक्षिणा देणे कठीण वाटले नसते. पण जिथे महिना पंचवीस रुपये कष्टाने मिळायचे, काही वार लावून, शिदोरी आणून चरितार्थ चालवायचा तरीसुद्धा पंचाईत, तिथे ही रक्कम नजरेबाहेर वाटल्यास आश्चर्य नाही. म्हणून हे जमणे अवघड वाटले.

तीन-चार दिवसांनी माझे बंधू, बंडोपंत पळशीकर व श्री. गोपाळराव साठे यांनी मला श्री. धोंडोपंत साठे यांच्यामार्फत भास्करबुवांकडे नेले.

जुनी किर्लोस्कर कंपनी असल्या वेळपासूनची धोंडोपंत साठे व

भास्करबुवांची ओळख होती. मला सायंकाळीच बुवांकडे नेले. त्यांना मी एक राग गाऊन दाखविला.

अगोदर गळा साफ असावा म्हणून आवाज मोकळा करण्यासाठी मी हिराबागेकडे अर्धा तास घालविला.

त्या वेळी भारत गायन समाज शुक्रवार पेठेत भुतकरांच्या वाड्यात होता. तेथे गेलो. मला पाहिल्याबरोबर बुवा म्हणाले, ' या मुलाला मी ओळखले. ' संत सखू 'तला हा विठोबा. हा शिकला तर उत्तम गायक होईल असे मी याच्या नाटकाच्या वेळी म्हणालो होतो.'

' आपले शब्द लक्षात ठेवूनच आम्ही आलो आहोत. घरची अत्यंत गरिबी असल्यामुळे काहीही देण्याची कुवत नाही,' असे बुवांना सांगण्यात आले.

परिस्थितीचे वर्णन ऐकून बुवा म्हणाले, ' तुम्ही काय देणार नि मी काय घेणार ? मात्र याने चिकाटीने शिकले पाहिजे. शिवाय मला मुलगाही नाही. हाच माझा मुलगा असे समजून मी याला शिकवीन.'

बुवांचे हे उद्गार ऐकून सर्वांनाच अतिशय आनंद झाला. योग असा की, त्याच रात्री डेक्कन कॉलेजात बुवांचे गाणे होते. ' यालाही बरोबर नेतो.' असे ते म्हणाले. अर्थातच बुवांबरोबर मी गेलो. त्या रात्री सुरुवातीसच मी एक पद म्हटले व नंतर बुवांचे रात्री दोन वाजेपर्यंत गाणे झाले.

अशा रीतीने माझ्या गायन शिक्षणास भास्करबुवा बखले यांच्यापासून सुरुवात झाली.

× × ×

## ॥ २ ॥

गुरूंची सेवा करून त्यांचे मन प्रसन्न ठेवणे हे शिष्याचे प्रथम कर्तव्य.

गुरुवर्य पं. भास्करबुवा बखले यांच्याकडे संगीतशिक्षणासाठी मी जाऊ लागलो. संगीत म्हणजे खरोखर तपश्चर्येने साध्य होणारी कला.

रोज पहाटे साडेपाच वाजता बुवांच्या घरी शिकण्यास जात असे. खर्ज भरणे, मंद्र, मध्य व तार सप्तकातील, भैरव रागातील स्वराचे पाठ मला म्हणण्यास देत असत. नुसता खर्ज भरणे अथवा खर्जातील एकच स्वर लावून बसणे याला मी कंटाळून जाईन म्हणून त्यांनी ही योजना केली होती. समर्थांचा 'मना सज्जना' हा श्लोकही रागात बसवून तो मला म्हणावयास सांगत. सकाळचा साडेसातपर्यंतचा वेळ यात जात असे.

त्यानंतर मी नित्याची कामे करीत असे. विहिरीचे पाणी काढून मी थंड पाण्याने स्नान करी. नंतर ठरलेल्या घरी शिदोरी किंवा "वाढणे" घेण्यास जाई. आई कामधंद्यास जात असे. दुपारी तीन वाजता बुवांच्या घरी व रात्री भारत गायन समाजात मी पुन्हा शिकण्यास जात असे. असा माझा दिनक्रम होता.

बुवांची शिकविण्याची हातोटी फारच चांगली होती. माझे वय व प्रकृती पाहून मला झेपेल अशा पद्धतीने ते शिकवीत. मी कंटाळून जाऊ नये म्हणून जी नाटकातील पदे माहीत असत, त्यांची मूळची चीज साधारणतः यमन, भूप रागातील. या चीजा मी लवकर आत्मसात करी. मला आठवते

की पाच सहा महिने मला यमन-भूपाची तालीम दिली गेली व ताला-करिता स्वतः डग्गा हातात धरून ते ठेका धरीत. आणि तंबोऱ्यावर मी हाताने ताल धरायचा. चीज तालामध्ये बसवली जात असे. सुरूवातीला 'हारवा मोरा दे' ही चीज शिकवली. यावरील 'नाथ हा माझा' हे स्वयंवरातील पद प्रासिद्ध आहे. 'इतने जोवनपर मान न करिये' तसेच विद्याहरण नाटकातील पदांची मूळची चीज त्यांनीच मला शिकविली. सहा महिने मी यमन—भूपाची तालीम घेत होतो.

बंधूंनी मला रोज विचारावे की गेले सहा महिनेपर्यंत बुवा तुला काय शिकवतात? तेव्हा आईने म्हणावे, 'तू केव्हा गवई होणार व स्टेजवर आणि मैफिलीत केव्हा गाणार?' बंधूंनी पुन्हा म्हणावे, 'फार सावकाशीने काम चालले आहे.' ते मला म्हणाले, 'बुवांना सांग की लवकर लवकर शिकवा.' बुवांना सांगण्याची माझी काय छाती होती? तेव्हा बंधूनीच एकदा हिय्या केला. 'तो गवई होण्यास या पद्धतीने फारच उशीर होईल. आमची परिस्थिती पाहून सर्व राग शिकवून त्याला लवकर तयार करावा.' यावर बुवा म्हणाले, 'तुम्ही शिक्षणात किती वर्षे काढ-लीत? तोच नियम गाण्यास आहे. यमन, भूप, म्हणजे तुम्ही समजता काय? या रागांतील चीजांमध्ये गायकीची सर्व अंगे मी त्याला शिकवितो. गायकी गळा तयार झाला की चीजा काय, वाटेल तशा आत्मसात करील. नुसती चीजांची संख्या वाढवून काय उपयोग? चीजेची अस्ताई, अंतरे व त्याच-बरोबर गायकी गायन एक तास तो गाईल इकडे माझे लक्ष आहे. तुम्ही परिस्थितीकडे पाहू नका. शिवाय प्रत्येक दौऱ्यात त्याला मी बरोबर नेतो. तेव्हा वर्षातून दोन तीन महिने तरी त्याचे जेवण माझ्याबरोबरच राहील.'

यावर बंधू निरूत्तर झाले.

गाण्यात गायकीचे अंग असणे हा गाण्यातील एक रूबाब असतो. मी गमक घ्यावयास लागलो म्हणजे बुवा माझ्या छातीस हात लावायचे व म्हणायचे, 'कृष्णा, मला तुझ्याबद्दल भीती वाटते. कुठं फट् होईल की काय? जरा बेतानं गमक घे. पुढे ताकद वाढली की तू गमक उत्तम घेशील'.... आणि बुवांचे हे म्हणणे पुढे खरे झाले. मी गमक उत्तम प्रकारे घेऊ लागलो.

मी अशक्त. मला ब्राँकायटिसची मुळातच व्यथा. तेव्हा बुवांनी मला डॉ. बाबुराव कीर्तने यांच्याकडे नेले व त्यांना म्हटले, 'कृष्णा बुद्धीने हुशार आहे. पण छाती मजबूत व्हायला हवी. तेव्हा याला उभा—आडवा तपासा.'

डॉक्टर कीर्तन्यांनी मला तपासले. आणि शक्तीचे औषध घेण्यास सांगितले. कॉडलिव्हर ऑईल बुवांनीच खरेदी करून दिले. पण खरे

औषध म्हणजे गाण्याची मेहनत. आणि ते औषध नियमितपणाने चालू असल्याने माझी प्रकृती व छाती चांगलीच सुधारली.

गाणे शिकणाऱ्याने गुरूचे मन राखून सेवा केल्यास विद्या आत्मसात होते. बुवा एक म्हण सांगत असत– ‘ सेवा करे, तब मेवा मिले. ’ गुरूंची सेवा करून त्यांचे मन प्रसन्न ठेवणे हे शिष्याचे प्रथम कर्तव्य. गुरूजी प्रसन्न मनाने शिकवितील तोच खरा प्रसाद. संगीत हा विषयच असा आहे की त्यात गुरूचे मन प्रसन्न राखावे लागते. आणि ज्या प्रसन्नतेतून त्यांच्याकडून शिक्षण मिळेल, ती प्रसन्नता शिष्यात येते. त्या प्रसन्नतेने शिष्य गाईल तर सारी जनता त्याच्या गाण्यावर प्रसन्न होईल. हाच नियम वादनातही आहे.

भास्करबुवा म्हणायचे, ‘ कृष्णा, मी तीन गुरू केले; व त्यांची सेवा केली. मी ब्राह्मण असूनही उस्तादजी मला जी जी कामे सांगत ती ती मी मनापासून केली. तुला ब्राह्मण गुरू लाभला आहे, हे तुझे भाग्य समज.’

बुवासाहेब मला गुरू लाभले हेच माझे मोठे भाग्य. आणि मुलाप्रमाणे त्यांनी मला शिकविले हे माझे सुदैव !

बुवांच्याकडे शिकण्यास सुरुवात केल्यानंतर सहा महिन्यांनी बेळगावी किर्लोस्कर कंपनीचा मुक्काम असताना मला त्यांनी तिकडे गाण्यास पाठविले. रात्री साडेनऊ ते एकपर्यंत गायलो. सर्वांनी माझी तारीफ केली. बुवांनी प्रचलित राग यमन, भूप, बिहाग शिकविले होते. बुवांनी थोड्या दिवसात फारच चांगले शिकविले आहे, त्यांना तू सोडू नकोस असे सर्वांचे उद्‌गार ऐकून ‘ मी माझ्या बुद्धीने गातो ’ असे काहीशा अहंकाराच्या भावनेने पण अभावितपणे म्हणालो.

माझ्या गाण्याची तारीफ किर्लोस्कर कंपनीतील ‘ बाजार मास्तर ’ वामनराव केळकर यांनी बुवांजवळ केली. आणि त्यांनी सांगितले, “ कृष्णाच्या गाण्यावर सर्वजण खूष झाले. पण कृष्णा म्हणाला की, मी माझ्या बुद्धीने गातो. त्यात त्याने तुमचे नाव घेतले नाही.”

हे ऐकताच बुवांनी माझ्या कानशिलात भडकावली आणि म्हटले, “ माझे नाव घ्यायला विसरलास होय. तर आता तुला मी शिकवणार नाही. तुझ्या बुद्धीनेच तू यापुढे गात रहा.’

बुवांचे हे शब्द ऐकून माझे डोके ठिकाणावर आले. ‘ आपण मला शिकविले असूनही मी आपले नाव घेण्यास विसरलो ही माझी चूक झाली.’ असे म्हणून मी बुवांचे पाय धरले.

माझे डोके ताळ्यावर आल्यावर गुरू व शिष्य हे आमचे नाते कायमचे लक्षात राहिले.

आता जी मी घटना सांगणार आहे ती १९१० च्या सुमाराची आहे. आमचे एक स्नेही श्री. गोपाळराव साठे हे फार हुशार गृहस्थ होते. शाळेच्या वार्षिक स्नेहसमेलनाप्रसंगी नाटकातून ते पुरुष पार्ट करीत असत. त्यांचा अभिनयही उत्तम असे. धुळे मुक्कामी आमचे आणखी एक स्नेही श्री. बंडोपंत पळशीकर बरेच दिवस रहात होते. त्यांनी माझ्या बंधूंना व गोपाळराव साठे यांना सांगून धुळ्यास माझे गाणे करविले. तिथे मला घरचा तंबोरा पाहिजे होता म्हणून साठ्यांनी 'स्टार्ट तंबोरा' अशी तार केली. तेव्हा तंबोरा घेऊन माझे बंधू आले.

धुळयाच्या 'कमिन्स' क्लबमध्ये मोठ्या प्रमाणावर माझे गाणे झाले. धुळ्याचे श्रीमंत भय्यासाहेब देशपांडे माझ्या गाण्यावर फार खूष झाले. रात्री दोनपर्यंत मी गायलो. क्लबचे सर्व सभासद खूष झाले व मला सुवर्णपदक देण्याचे ठरले. मात्र हे पदक समारंभपूर्वक पुण्याला देण्यात येणार होते.

ते साल १९११ असावे. काकासाहेब खाडिलकरांच्या 'विद्याहरण' या नाटकाचा पहिला प्रयोग पुण्यास किर्लोस्कर थिएटरात होणार होता. त्याचवेळी वरील सुवर्णपदक समारंभपूर्वक मला मिळणार होते. त्यावेळचे कंपनीचे मॅनेजर श्री. शंकरराव मुजुमदार यांनी या समारंभास नकार दिला. शेवटी हे प्रकरण तात्यासाहेब केळकरांपर्यंत गेले. त्यांनी मुजुमदार यांना कळविले की, हा समारंभ आहे. कृष्णा मास्तर हा भास्करबुवांचा शिष्य आहे. शिवाय विद्याहरण नाटकातील बऱ्याचशा चाली भास्करबुवांनीच दिलेल्या आहेत. तेव्हा हा समारंभ विद्याहरण नाटकाच्या वेळीच होणे इष्ट आहे.

तात्या केळकरांच्या या म्हणण्यापुढे कोणाचीच 'ब्र' काढण्याची प्राज्ञा नव्हती. धुळ्याचे रावसाहेब उपासनी यांच्या हस्ते हा समारंभ 'विद्याहरणा'चा पहिला अंक संपल्यावर झाला. त्यावेळी मी एखादे गाणे म्हणावे असा प्रेक्षकांनी आग्रह धरला. पण चालू नाटकाच्या रंगात खंड पडू नये म्हणून मी पद म्हटले नाही. समारंभ झाल्याबरोबर मी गुरुवर्य भास्करबुवांच्या पाया पडलो. त्यावेळी माझे वय फक्त चौदा वर्षांचे होते.

सन १९१२-१३ सालातील ही गोष्ट असावी. बुवांची सासुरवाडी सातारा येथील होती. श्री. रामभाऊ ऊर्फ भाऊसाहेब देवस्थळी यांची कन्या म्हणजेच बुवांच्या पत्नी होत. वर्षातून एकदा — म्हणजे आश्विन-कार्तिकात बुवा सातारला जात असत. मीसुद्धा जात असे. घरातील सर्वजण बरोबर असत. जुने घर असले तरी जागा विपुल होती. मागे बाग होती. तीत शेवंतीची फुले, भाजीपाला लावलेला होता. संध्याकाळची बैठक या बागेतच घातलेली असायची. बुवासाहेब मला तिथे तालीम देत. पूरिया-

धनाश्री या रागांची तालीम मला तिथेच सुरुवातीला मिळाली. सर्वजण मला कृष्णाऐवजी प्रेमाने ‘ कैया ’ असे म्हणत. साताऱ्याला असताना श्रीसमर्थांच्या सज्जनगडावर दोन दिवस गेलो होतो. त्यावेळी मोटारी नसल्याने आम्ही छकड्यातून गेलो होतो.

प्रवासात आम्ही एकत्र असलो – अथवा टांग्यातून जरी जात असलो – की एखाद्या रागातीलच चीज बुवा मला गायला लावत.... ‘ अरे, मला आता या चीजेची आठवण झाली. एकदा विसरलो की आठवायची नाही. तर तू चीजेची याद कर. ’ असे ते म्हणत. त्यांचा हा स्वभावच होता. ते एरव्ही गाण्यास बसले म्हणजे अस्ताई म्हणत असताना ते रंगून जात. आणि पुन्हा अंतरा म्हणायची वेळ आली तर रंगात असल्यामुळे अंतऱ्याचे शब्द एकदम लक्षात येत नसत. अशा वेळी मला शिकविलेल्या चीजांचा उपयोग होत असे; आणि त्यावेळी मी मागे असेच. त्या अंतऱ्याची आठवण करून दिली की ‘ भले शाबास ’ म्हणून बुवा माझी तारीफ करीत. अर्थात असे प्रसंग फार थोडे येत. पण अशा वेळी प्रवासात याद केलेल्या चीजांचा मला फार उपयोग होत असे.

बुवासाहेबांकडे शिकायला जाऊन आता मला एक वर्ष झाले. माझे बंधू मधून मधून अब्दुल करीम खाँसाहेब यांच्याकडे शिकण्यास जात असत. बंधूंनी मला एकदा त्यांच्याकडे नेले. त्यावेळी आर्य संगीत विद्यालय शुक्रवारात पंतसचिव वाड्यासमोर होते. ती वेळ सायंकाळची होती. खाँसाहेबांची पाय-पेटी होती. त्या सुरावर मी ‘ पुरवी ’ रागातील ‘ कगवा खोले मोरे अटरिया ’ ही चीज गायलो. खाँसाहेब म्हणाले, ‘ भास्करबुवाने अच्छा बतलाया और कृष्णाने इस उमरमे थोडेही दिनमे ठीक गाया. बुवाको तुम मत छोडो कृष्णा.’ खाँसाहेबांचे हे उद्गार ऐकून बंधूंना धीर आला.

एकदा माझ्या गाण्याचा जलसा कोतवाल चावडीजवळील नूतन आर्यभूषण थिएटरमध्ये झाला. सुरुवातीला मी बिहाग गायलो. माझे बंधू गॅलरीचे तिकिट काढून माझ्या कार्यक्रमाला बसले आहेत हे मला माहीत नव्हते. माझे गाणे चालू असताना जेव्हा ते माझ्याकडे पाहून ‘ असा गा, अशी गमक घे ’ असे हाताच्या खुणा करून सांगू लागले तेव्हा माझे लक्ष त्यांच्याकडे गेले. आणि थोडीशी भीतीसुद्धा वाटली. पण कचरलो मात्र नाही. ‘ छान गायलास ’ म्हणून मला बुवांनी शाबासकी दिली. पण मनात म्हटले, ‘ घरी गेल्यावर काय होते कुणास ठाऊक ! ’

पण घरीसुद्धा बंधूंनी गाणे चांगले झाले असे म्हटल्यावर माझे समाधान झाले.

गुरुवर्य भास्करबुवांकडे शिकायला लागल्यापासून थोड्याच अवधीत बुवांसाठी लावलेल्या जलशात मी. भाग घेऊ लागलो. जलशात सुरुवातीला मी गात असे. माझ्यानंतर बालगंधर्व गात असत. त्यानंतर गोविंदराव टेंबे यांचे पेटीवादन होई. शेवटी बुवासाहेब गात असत. असे जलसे पुणे, सोलापूर, महाबळेश्वर, मुंबई, बार्शी, सातारा, नासिक, अकोला, नागपूर, जबलपूर, इत्यादी अनेक ठिकाणी झाले. त्यामुळे मला बैठकीच्या गाण्याची अनायासे तालीम मिळाली.

मी बुवांकडे शिकायला असताना श्री. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकरही गाणे शिकायला येत असत. नेहमीची पगडी खुंटीला अडकवून ते साधी टोपी घालून गाणे शिकायला बसत. काही सारेगम व सुरावट शिकायचे. काही कारणाने बुवा मध्यंतरी गावाला गेले असताना श्री. काकासाहेब खाडिलकर यांना शिकविण्याची पाळी माझ्यावर आली. अर्थात त्याच वेळी मी गादीवर बसत नसे. काकासाहेबही साध्या बैठकीवर बसूनच शिकत. बुवांच्या देखतही ते गादीवर बसत नसत. ते मला म्हणायचे, ‘ तू मोकळेपणाने बसून, न घाबरता मला शिकव.’

त्यांची गाण्याची हौस पाहून बुवांनी त्यांना विचारले, ‘ आपण गाणं कशासाठी शिकता ?’ त्यावर काकासाहेब म्हणाले, ‘ मला कीर्तनात तालासुरात गाणे म्हणता यावयास पाहिजे म्हणून मी गाणे शिकतो.’ बुवासाहेबांनी दिलेल्या संगीत शिक्षणाचा उपयोग श्री. खाडिलकरांना, त्यांनी रचलेल्या संगीत नाटकांतून मूळच्या चालीबरहुकूम पदे करण्यास खूपच झाला.

माझा आवाज मुळात गोड होता. सुरात पक्केपणा होता. प्रथम प्रथम मी ठराविक ताल गायचा. दादरा, केरवा व त्रिताल हे माझे आवडीचे ताल. पण पुढे एकताल व झपताल मात्र मला जड जायचे. त्यासाठी मी अनेक वेळा बुवासाहेबांच्या चापट्या खाल्ल्या आहेत. काही वेळा बुवासाहेब माझ्या मांडीवर ताल धरीत आणि काही वेळा रागावून चापट्या जोरात मारीत. त्यामुळे माझी मांडी अगदी हुळहुळून जाई. ताल समजला की मी करुणस्वराने ‘ होय, होय ’ म्हणत असे. ताल अंगात भिनला पाहिजे असे ते म्हणत. हळूहळू एकताल, झपताल पूर्ण झाला. अस्ताई, अंतरे, सुरावट पक्के झाल्यावर लयबाजीकडे लक्ष देण्यास त्यांनी मला सांगितले. लयबाजपणाकरिता बुवासाहेबांची प्रसिद्धी होती. थोडे कमी गायलास तरी चालेल, पण गाणे बेलय होता कामा नये, असे ते मला म्हणायचे.

दोन वर्षात बुवांनी माझी चांगली तयारी करून घेतली. त्यांच्या

परवानगीने मी काही वेळा स्वतंत्रपणे गाऊ लागलो. मेहनतही चालूच होती.

आता माझ्या गाण्याचे घरीसुद्धा कौतुक होऊ लागले होते!

१९१४–१५ सालची आठवण अजून मनात घर करून राहिली आहे. गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन यांचा मुक्काम पुण्यात होता. कौन्सिल हॉलमध्ये त्यांच्यासमोर एक मैफल व्हावी, असे ठरले. त्यावेळी श्रीमंत काशीनाथपंत छत्रे आणि रावबहाद्दूर देवल यांनी पुढाकार घेतला. या मैफलीत माझा पंधरा मिनिटांचा कार्यक्रम ठेवण्यात आला होता. या मैफलीत नामांकित गायक थोरले रहिमत खाँसाहेब, भास्करबुवा बखले, खाँ अबदुल करीम खाँ, बरकतुल्ला खाँ सतारिये, खाँ मुरादखाँ बीनगार यांचे गायनवादन होणार होते.

या मैफलीत गाण्यासाठी ' मुंदरी मोरी काहेको छीन ली ' ही अडाणा रागातील चीज माझ्याकडून बसवून घेण्याचे बुवांनी ठरविले.

गायन समाजाची वेळ सोडून दुपारी तीन वाजता मला शिकविण्यासाठी बुवा घरून समाजात येत असत. रोज तालीम चालू होती. मी समाजात दुपारी तीन वाजता हजर राहात असे.

त्याचवेळी पी. वाय. सी. जिमखान्यावर क्रिकेटची एक मॅच चालू होती. ती पाहाण्याचा मोह काही मला आवरेना म्हणून मी दोन दिवस मॅच पाहाण्यात घालविले व तालमीला गैरहजर राहिलो. त्याबद्दल गुरुजी रागावतील ही भीती वाटतच होती. परंतु काही तरी सांगून वेळ मारून नेण्याचे मी ठरविले. ' बंधूंना ' डबा नेऊन देण्यासाठी जावे लागल्यामुळे समाजात येण्यास वेळ झाला नाही असे मी खोटेच बुवांना सांगितले.

परंतु खोटे कधीही पचत नाही. कधीतरी ते बाहेर पडतेच.

दोन चार दिवसांनी बुवांची आणि बंधूंची अचानक गाठ पडली. बुवांनी साहजिकच विचारले, ' कृष्णा दोन दिवस तालमीला आला नाही. तुम्हांला जेवणाचा डबा पोचता करायचा होता वाटते? पण त्यामुळे त्यांची दोन दिवसांची तालीम चुकली.'

बंधूंनी सांगितले, ' तो मला डबा देण्यास कधीच आला नाही. मी असे सांगेन कसे? ' हे ऐकून बुवासाहेबांना राग आला, पण मी त्यावेळी तिथे नव्हतो.

घरी गेल्यावर मला बंधूंनी याबाबत विचारले. ' मी क्रिकेटची मॅच पाहावयास गेलो होतो ' असे मी खरेखरे सांगून टाकले.

दुसऱ्या दिवशी दुपारी गायन समाजात गाण्यास गेलो. बुवा माझ्या अगोदरच हजर होते. मी हलक्या पायाने पेटीचा सूर धरला आणि मुलतानी रागातील पलटे गाण्यास सुरुवात केली. बुवा रागाने म्हणाले,

'गाणे एकदम बंद कर." मी घाबरलो. माझ्याशेजारी दत्तोपंत बागलकोटकर, बाळोबा दिवटे बसले होते. बुवासाहेब बागलकोटकरांना म्हणाले, 'ती काठी आणा' तशी ते कचरले. तेव्हा बुवांनी स्वतः काठी घेतली आणि वीरासन घालून मला तडाखे देण्यास सुरुवात केली. दहा वळ उठेपर्यंत त्यांनी तडाखे दिले. दत्तोपंत बागलकोटकर व दिवटे दोघेही घाबरले. थांबण्याची ते बुवांना विनंती करीत होते. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. कपडे घालून त्या रात्री मी तसाच रडत घरी आलो. पहातो तो पाठीवर आठ-दहा काळसर निळसर वळ उठलेले. अर्थातच ते घरी मी कुणास दाखवले नाही. कारण घरी पुन्हा बोलणी खावी लागली असती.

समाजातून बुवा घरी गेले. आणि गुपचूप बसून राहिले. त्यांच्या पत्नीनी सौ. ताईंनी—'जेवावयास उठा' असे म्हणताच ते एकदम म्हणाले, "अभी चूप, बात मत करो."

थोडया वेळाने ते शांत झाले. ते म्हणाले, "आज मी 'कृष्णाला खूप मारले. आता तो माझ्याकडे शिकायला यायचा नाही." बुवा जेवावयास उठले नाहीत. पंढरपूरकरबुवा, शंकरबुवा अष्टेकर यांनी त्यांची खूप समजूत काढण्याचा प्रयत्न केला. पण काही उपाय चालला नाही. त्या रात्री बुवा जेवले नाहीत की त्यांना झोप लागली नाही.

उजाडण्यापूर्वी म्हणजे साडेपाच वाजता मी बुवांकडे गाण्यास जात असे. त्यांच्याकडे येणाऱ्या दूधवाल्याची आणि माझी जाण्याची वेळ एकच यायची. नेहमीप्रमाणे मी गेलो. दूधवालाही माझ्यापुढेच होता. त्याने दार वाजवले आणि ताईंनी ते उघडले. मला मागे पाहताच त्या बुवांना म्हणाल्या, "अहो, पाहिलंत का ? कृष्णा आला आहे."

"काय म्हणतेस. कृष्णा आला आहे ?" बुवांना मी आल्याचा कल्पनातीत आनंद झाला.

आत जाताच मला जवळ घेऊन बुवा अक्षरशः रडले. आम्ही दोन-तीन मिनिटे अगदी स्तब्ध होतो. आनंदाश्रूचा बहर ओसरला. माझ्या पाठीवरून हात फिरवून ते म्हणाले, "कृष्णा, तू चांगला तयार होशील. हं. चल, कर सुरुवात."

मी गाण्यास बसलो. 'मंदरी मोरी कोहेको छीन लई;' ही 'अडाणा' रागातील चीज गाऊन कृष्णा 'शहाणा' झाला. 'शहाणा' हा सुद्धा रागाचा एक प्रकार आहे.

—त्यानंतर अर्थात थोडयाच दिवसात कौन्सिल हॉलवर गव्हर्नरां-

पुढे गायन वादनाचा जलसा झाला. आणि माझा 'अडाणा' पण उत्तम रंगला.

गुरुवर्य बुवासाहेब जसे रागीट होते तसेच अत्यंत प्रेमळही होते. त्यांच्या प्रेमास मी पात्र झालो. म्हणून बुवासाहेब ह्यात होते, तोपर्यंत त्यांच्या संमतीशिवाय मी कोणतीही गोष्ट केली नाही.

× × ×

## ॥ ३ ॥

### गंधर्व कंपनीत मी : एकाच वेळी दोन लग्नांच्या दिव्यातून सुटलो

ते १९१४ साल असावे. त्यावेळची एक घटना माझ्या चांगलीच लक्षात आहे. गिरगावात आता जिथे पोस्ट आहे, तिथे अमरेली नावाचा एक हॉल होता. तिथे नेहमी जलसे होत. त्याच ठिकाणी एक 'दावत' झाली. ही दावत शमिया, पुतळी या गाणाऱ्या बायका करीत. तीत मोठे गायक, वादक व नृत्यकार यांनीही भाग घेतला होता. गुरुवर्य बुवासाहेबही त्यावेळी होते. मला आठवते की त्यावेळी कलकत्याच्या मलकाजान नावाच्या एक बाई होत्या. मख्खनवाली नावाची आणखी एक बाई होती. तिचा आवाज फारच मुलायम होता, म्हणून तिला हे नाव पडले असावे. त्याचवेळी रात्री साडेअकराच्या सुमारास एका मोठ्या नृत्यकार बाईचा नाच झाला. या बाईचे नाव बिछवाबाई. बाईचे वय ५०-५१ वर्षांचे असेल. तिने नाचाच्या वेळी जो पेहराव केला होता, त्यावरून तिचे वय फारच कमी वाटायचे. ती नाचास उभी राहिली. तोंडाने बोल म्हणून ती पदन्यास घेत होती. चेहऱ्यावरील हावभावही प्रशंसनीय होते. लोक वाहव्वा करू लागले.

पुढे एक चमत्कार झाला! बाईने डोक्यावर पाण्याने भरलेला ग्लास ठेवला. लयही बरीच वाढविली. ती इतकी की ग्लासमध्ये भरलेल्या पाण्याला गती येऊन त्यात भोवरा उत्पन्न झाला. तो आम्ही सर्वांनी पाहिला. पाण्याचा एक थेंबही बाहेर सांडला नाही. बिछवाबाईने पायात इतके चाळ

बांधले होते; तरी नृत्य करताना त्यांतील एकच घुंगरू वाजतेय असे वाटे. इतक्या सफाईने आणि कौशल्याने ती नाचली.

दावतीच्या या कार्यक्रमास मुंबईचे अनेक शेट्ये, भाटिये उपस्थित होते. ही मंडळी त्याकाळी फारच शौकीन असत. अनेकांचा बुवांशी परिचय होता. कारण बुवांची त्यांच्याकडे गाणी झाली होती.

इंदूरचे श्रीमंत तुकोजीराव महाराज होळकर हे गाण्याबजावण्याचे फार शौकी. कलावंताचे ते नेहमीच स्वागत करीत. त्यांचे औदार्यही फार मोठे होते.उत्तर हिंदुस्थानातील कलावंत त्यांना ‘ कर्णका अवतार ’ म्हणत. काही भाटियांनी बिछ्राबाईच्या नृत्याची तारीफ महाराजांजवळ केली व श्रीमंतांनी हा नाच पहावाच असा आग्रह केला. महाराजांचा मुक्कामही मुंबईला होता.

आपल्या वाढदिवशी बाईंनी यावे असे त्यांनी सांगितले आणि ठरल्याप्रमाणे महाराजांसमोर बिछ्राबाईच्या नाचाचा कार्यक्रम झाला.

बाईंचे कौशल्य, चपलता आणि तयारी पाहून महाराज खूष झाले. डोक्यावरील पाण्याच्या ग्लासातून एक थेंब न सांडताही होत असलेले रंगदार नृत्य पाहून तर महाराज बेहद्द खूष झाले.

त्यांनी बाईंना विचारले, ‘ आपकी उम्र कितनी है ? ’

बाईंनी जवाब दिला, ‘ मेरी उम्र ५२ सालकी है । ’

हे ऐकून महाराजांनी बाईंना ५२ हजार रुपये दिले. बाई सहज म्हणाल्या, ‘ इस समय मेरी उमर अस्सी ( ८० ) बरसकी होती तो कितना अच्छा होता. ’

महाराज म्हणाले, ‘ आप सौ बरस जिंदा रहे । एक लाख मिल जायेंगे । ’

असे होते महाराज, कलाप्रेमी. कलेची कदर करणारे आणि उदार !

गुरुवर्य भास्करबुवा बखले यांच्याकडे माझे शिक्षण चालू होते. १९१५ साली बुवासाहेब होळी उत्सवाकरिता म्हणून अमृतसरला जाण्यासाठी निघाले. अर्थात मीसुद्धा त्यांच्याबरोबर होतो.

गंधर्व नाटक मंडळीचा मुक्काम बडोद्यास होता. म्हणून बुवासाहेब, त्याच्या पत्नी व मी बडोद्यास उतरलो. गंधर्व नाटक मंडळी दरवर्षी बडोद्यास श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांच्यापुढे चार खेळ करून दाखवीत असे. याचे कारण असे की, कंपनीला महाराजांचा आश्रय होता व त्याप्रीत्यर्थ ते पाच हजाराचे वर्षासन कंपनीस देत. कंपनीचा मुक्काम सालाबादप्रमाणे बडोदा येथे असताना एक अचानक विघ्न उपस्थित झाले.

श्री. नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व यांच्या खांद्यावर पडदा पडला आणि त्यामुळे त्यांचा खांदा दुखावला. परिणामी बालगंधर्व आजारी पडले. महाराजांना आता खेळ कसा दाखवायचा अशी पंचाईत पडली. अनायासे बुवासाहेब बडोद्यास होते व त्यांच्याबरोबर मी सुद्धा होतो – हे पाहून कंपनीचे मालक, व्यवस्थापक व बडोदे सरकारचे कारभारी श्री. शिरगावकर यांचे आणि बुवासाहेबांचे बोलणे झाले. बालगंधर्वांच्या ऐवजी कृष्णाने शारदेची भूमिका करावी, असा त्यांनी बुवांजवळ आग्रह धरला.

बुवांनी मला जवळ बोलावून सर्व समजावून सांगितले. पण मी त्यांना नकार दिला. 'आपणास सोडून मी राहाणार नाही. तसे केल्यास बंधू व आई माझ्यावर अतिशय रागावतील.' असे मी सांगितले.

'मी तुला नाटक कंपनीतच राहा, असे सांगत नाही. दहा बारा दिवसांनी मी परत येणारच आहे. तुला परत नेईन– काळजी मुळीच करू नको,' असे बुवा म्हणाले.

रात्र पडली–आणि बुवांनी आपल्या ट्रंकेतून माझे करडे, जरीची टोपी वगैरे सामान काढून ठेवले. मला अतिशय वाईट वाटत होते. गाडीची वेळ झाली आणि बुवा जाण्यास निघाले. स्टेशनच्या रोखाने टांगा निघाला. मला अगदी राहवेना. त्यांच्या टांग्याच्या मागे मी पळत चाललो. थोडे अंतर गेल्यावर बुवांनी टांगा थांबविण्यास सांगितले.

टांगा थांबला. मला आत घेण्यात आले. बुवांबरोबर कंपनीचे व्यवस्थापक श्री. बाळासाहेब पंडित होते. आम्ही बडोदा स्टेशनवर आलो. गाडीत बसताना बुवा मला म्हणाले, 'कंपनीच्या अडचणीच्यावेळी आपण उपयोगी पडले पाहिजे ना? तुझे काम उत्तम होईल. पदेही चांगली गाशील. मुळीच काळजी करू नकोस.' बुवांनी मला आशीर्वाद दिला. गाडी सुटली आणि डबडबल्या डोळ्यांनी मी कंपनीच्या बिऱ्हाडी आलो.

'शारदा' नाटकाचे लेखक श्री. गोविंद बल्लाळ देवल यांचाही मुक्काम कंपनीतच होता. 'संशय कल्लोळ' हे नवे नाटक त्यांना बसवायचे होते. 'शारदे'ची भूमिका मी करायची असे ठरल्यावर हे काम शिकविण्यास देवलांनी सुरवात केली. आपल्या अंगावरचे उपरणे त्यांनी मला नेसविले आणि बायकी पद्धतीने –गुडघे न मोडता–अगदी लवून नमस्कार कसा करायचा तेही शिकविले. नाटकातील प्रत्येक वाक्य स्वच्छ, स्पष्ट आणि तालबद्ध कसे म्हणायचे याची तालीम त्यांनी मला स्वतः हातावर ताल धरून शिकविली. 'जाऊ दे ग त्या मेल्याची आठवण काढू नकोस' हे वाक्य त्रितालाच्या सोळा मात्रेत समेपासून समेपर्यंत बरोबर कसे बसवावे, हे त्यांनीच मला शिकविले.

तालीम संपल्यावर विरंगुळा म्हणून देवल संध्याकाळच्या वेळी राजमहाल रोडने, एक मैलावर असलेल्या एका बगिच्यात फिरावयास जात. तिथे एक शंकराचे मंदिरही होते. कधी कधी मीसुद्धा त्यांच्याबरोबर असे. अशाच एकावेळी त्यांनी मला शारदेतील ' जयकृष्णा तटवासा ' हे महत्त्वाचे पद शिकविले.

नाटकाचा दिवस जवळ येत होता. आणि आमची तालीमही धुमधडाक्याने चालू होती. उपरण्यापासून ते नऊवारी लुगड्यापर्यंतचा हा लांबचा पल्ला असल्याने मला फारच कष्ट घ्यावे लागले ! त्यावेळची एक गमतीदार घटना अजूनही ताजी वाटते. माझे पुढचे दोन दात काहीसे मोठे व थोडे पुढे होते. बडोद्याचे सरदार श्रीमंत बुवासाहेब निंबाळकर यांनी मला तेथील एका हकीमाकडे नेले. त्याने पुढच्या दोन दातांना काही तरी औषध लावले आणि कानशीने ते दात घासून इतर दातांबरोबर सरळ एका ओळीत केले.

शारदेची भूमिका चांगली बसली असा आत्मविश्वास मला आला आणि श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्यापुढे प्रयोग करण्याचे ठरले. आजारी स्थितीत होते, तरीसुद्धा बालगंधर्वांनी नटीचे काम केले. माझी महत्वाची अशी पहिलीच स्त्री-भूमिका मी उत्तम प्रकारे पार पाडली, असा रसिकांचा अभिप्राय पडला. या नाटकाला महाराजांचे पाहुणे म्हणून पंडित भातखंडे उपस्थित होते. ते महाराजांना म्हणाले, ' हा मुलगा गवई-गाणेसुद्धा फार चांगले जाणतो. गातोही फारच छान. महारांजांनी एकदा ऐकावे.' महाराजांपुढे गाण्याचा योगही लवकर आला.

गंधर्व कंपनीत मी शारदेचे काम केल्याचे वृत्त पुण्याला माझ्या मातोश्रींना आणि बंधूंना समजले. तेव्हा त्यांना वाटले की बुवांना सोडून मी कंपनीतच राहिलो. सर्वांनाच आश्चर्याचा धक्का बसला. मातोश्री तर पुण्याहून थेट बडोद्यालाच आल्या.

बुवांना मी काही सोडले नाही. त्यांच्याच आग्रहामुळे शारदेची भूमिका केली.' असे जेव्हा तिला समजले, तेव्हाच तिचे समाधान झाले.

बुवा परतीच्या प्रवासात बडोद्यास आले. त्यांच्याबरोबर मी पुण्यास आलो. मी कदाचित गोविंदराव टेंबे यांच्या नाटक कंपनीत जाईन या भीतीने नाटक मंडळीचे व्यवस्थापक श्री. पंडित आमच्या पाठोपाठ बडोद्याहून आले. ते बुवांना भेटले व म्हणाले, ' कृष्णाचा बॉंड लिहून घ्यावा आणि त्याला गंधर्व नाटक मंडळीत दाखल करावा.'

बुवांना गंधर्व नाटक मंडळीबद्दल खूपच जिव्हाळा होता. संगीताच्या बाबतीत तर ते कंपनीचे गुरूच होते. मध्यंतरी काही कारणांवरून त्यांचा

व गोविंदरावांचा मतभेदही झाला होता. त्यात काकासाहेब खाडिलकर यांचेही असेच मत पडले, की मी गंधर्व कंपनीत जावे.

खूप खल झाला. चर्चा झाली. मगच माझा बाँड झाला. त्यावर खाडिलकरांप्रमाणेच श्रीनिवासराव ऊर्फ सिनबा धारवाडकर, यांचीही सही होती.

अशा रीतीने गंधर्व नाटक मंडळीत मी रीतसर दाखल झालो ! नेमणुकीनंतरची माझी पहिलीच भूमिका ' शारदे'ची होती. या ' शारदा ' नाटकाचा प्रयोग बाँबे थिएटर्समध्ये झाला. माझी नवीन नेमणूक, काही नावलौकिक आणि बुवांचा शिष्य यामुळे त्यादिवशी नाटकाला खूपच गर्दी झाली होती. माझी भूमिका पाहण्यास कंपनीचा चाहता वर्ग लोटला होता. मोठ्या आत्मविश्वासाने मी भूमिका वठाविली. गाण्यालाही तीन-चार वेळा ' वन्स मोअर ' मिळाला.

बडोद्यास मी केलेल्या कामाची हकीकत बंधूंच्या कानावर गेलीच होती. मुंबईतल्या या प्रयोगास ते मला काहीही कल्पना न देता हजर राहिले. थिएटरच्या गॅलरीत ते बसले होते; हे मला पहिला अंक झाल्यावर समजले. पहिल्याच अंकात दोन तीन ठिकाणी ' वन्स मोअर ' मिळाल्याने माझी भीड चेपली. पुढचे कामही उत्तम झाले. नाटक संपल्यावर बंधूची गाठ पडली. त्यांना मोठे समाधान वाटले.

' शारदे 'ची भूमिका पुढे मी कित्येक वर्षे केली.

१९१६ ते १८ हा काळ माझ्या दृष्टीने फारच चांगला गेला. आपण पुरुष पात्राची भूमिका करावी, अशी बालगंधर्वांची फार दिवसांची इच्छा होती. म्हणून देवलांच्या ' शापसंभ्रम ' नाटकात मी महाश्वेतेची आणि राजहंसांनी पुंडरिकाचे काम केले. आम्हा दोघांचीही कामे उत्तम झाली.

त्याकाळी नाटकातील मंडळींबद्दल जुन्या पिढीतील लोकांना तितकासा आदर नव्हता. मी तर नाटकांत स्त्रीभूमिका करत असे. मी लग्न करावे असा आईचा सारखा लकडा मागे होता. हा नाटक्या आहे, मिशा भादरलेला आहे, याचे तोंड पाहाणे नको, असा माझ्याबद्दल ( गैर ) समज होता. नाट्यप्रयोगासाठी कंपनी ज्या ज्या गावी जाई, त्या त्या ठिकाणी मला बिऱ्हाडासाठी जागाही मिळणे कठीण होत असे.

नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे गंधर्व नाटक मंडळीचा मुक्काम बडोद्याला होता. ते १९१८ साल होते. तुकाराम अप्पाजी चव्हाण ह्या मेजरच्या हुद्यावर असलेल्या लष्करी अधिकाऱ्याची ओळख झाली ती याच मुक्कामात. चव्हाण यांचे एक स्नेही श्री. नारायण सदाशिव काळे हे सातारला होते.

त्यांची मुलगी लग्नाची होती. हे लक्षात घेऊन चव्हाणांनी काळयांना पत्राने कळविले, ' येथे एक मुलगा लग्नाचा आहे. त्याचे वय १९ असून, तो गुणी आहे. बडोद्याला अवश्य या.' मुलीचे लग्न लवकर करावयाचे असल्याने श्री. काळेही ताबडतोब आले. डोक्याला भले मोठे पागोटे, लांब अंगरखा असलेल्या काळयांना श्री. चव्हाण थिएटरमध्येच घेऊन आले.

त्या दिवशी ' मूक नायका 'चा प्रयोग होता. त्यात मी ' वेत्रिकेचे ' काम करीत होतो. अंगावर भरजरी शालू, डोक्यात फुलांची वेणी, कमरेला कमरपट्टा, पायात तोड्या आणि शिंदेशाही तोडे असा माझा ' थाट ' होता.

' वुईंग ' मध्ये उभे राहून चव्हाण यांनी आमच्या भावी श्वशुरांना, माझ्याकडे बोट दाखवून म्हटले, ' हाच तो मुलगा–तुमचा जावई ! ' आमचे श्वशुर तर बुचकळ्यातच पडले. ते चव्हाणांना म्हणाले, ' इतक्या दूरवर मला बोलावून घेतलेत–आणि माझी चेष्टा करता काय ? मला तुम्ही चांगलेच बनवलेत.'

श्री. काळे जुन्या चालीरीतीचे आणि मताचे. त्यांनी नाटकेही पाहिली नव्हती. ते चव्हाणांना म्हणाले, ' अहो, ही तर मुलगी आहे.'

चव्हाण म्हणाले, ' आता पाच सहा तासांकरिताच ' हा मुलगी आहे. नंतर मुलगा होईल.' चव्हाणांचे म्हणणे काळयांना काही पटेना.

प्रवेशातील काम संपवून मी वुईंगमध्ये आलो. श्री. चव्हाणांनी माझी ओळख करून दिली आणि मी काळे यांना काहीसा लवून नमस्कार केला. ' हा पहा, बायकी पद्धतीचा नमस्कार झाला की नाही ! ' काळे म्हणाले. मग काही वेळ मी त्या दोघांपुढेही गेलो नाही. थोड्याच वेळानं नायिका ' सरोजिनी 'च्या वेषातील बालगंधर्वांची ओळख चव्हाणांनी काळे यांना करून दिली. काळे काहीशा रागाने व उपहासाने म्हणाले, ' ही तिची थोरली बहीण; नारायणराव फारसे बोलले नाहीत. आपल्या मास्तर कृष्णाला ही मंडळी पाहायला आली आहेत, हे मात्र त्यांनी ताडले. किंबहुना त्यांना ते माहितही असावे. बालगंधर्वांनी त्या दोघांनाही दुसऱ्या दिवशी कंपनीतच जेवावयास बोलाविले.

त्या दिवशी रंगपंचमीचा सण होता. कंपनीत रंगपंचमी मोठ्या धुमधडाक्याने साजरी होई. मोठमोठी तांब्याची पिंपे रंगाने भरलेली असत. पिचकाऱ्यांऐवजी तपेल्या भरून कंपनीतील माणसांवर आणि निमंत्रितांवर रंग ओतला जात असे. सणाचा दिवस असल्याने श्रीखंड पुरीचा बेत होता. सव्वा हात केळीच्या पानावर पदार्थ वाढलेले होते. मी अंगात मलमलचा सदरा घातला होता. डोक्यावरचे मूळचे लांबलचक केस वळवून

ते खोचून टाकले होते. ‘ कालची मुलगी झालेली हाच तो मुलगा ’ असे काळ्यांना सांगताच त्यांनी माझ्याकडे न्याहाळून, अगदी बारकाईने पाहिले. मी मुलगाच असल्याचे त्यांना पटले असावे. त्यांनी नंतर कंपनीतील माझ्या बिऱ्हाडीच एक दिवस मुक्काम केला. विवाहाबद्दल आमचे बोलणे झाले. मी त्यांना म्हटले, ‘ पुण्याला माझी आई आणि थोरले बंधू असतात. त्यांना तुम्ही भेटा आणि बोलणी करा.’

श्री. काळे लगोलग पुण्यास येऊन माझ्या आईला भेटले. ‘ माझी आता पूर्वीसारखी परिस्थिती राहिलेली नाही. मी गरीब आहे.’ असे त्यांनी बंधूना सांगताच आमचे बंधूच म्हणाले, ‘ अहो, आम्ही तरी कुठे श्रीमंत आहोत? माझ्या भावाला जेवूनखाऊन साठ रुपये पगार आहे. तथापि लग्न कर्तव्य आहे.’

माझ्या थोरल्या बंधूंना त्यावेळी पंचाहत्तर रुपये पगार होता. माझ्या पगारा व्यतिरिक्त आई धुणीभांडी, दळणकांडण वगैरे कामे करीत असल्याने आमचा चरितार्थ निभावून जात होता. परंतु मुलगा नाटकात काम करीत असूनही त्याचे लग्न जमले आहे आणि मुलगीही बरी आहे. म्हणून लग्न करण्याचे सर्वानुमते ठरले. हे लग्न पुण्यास वैशाखमासी अठरा साली झाले. श्रीमान नानासाहेब चंद्रचूड यांनी आपली जागा लग्नासाठी मोफत दिली. त्याच सुमारास गंधर्व नाटक मंडळी तपकीर गल्लीतील सांगलीकरांच्या वाड्यात उतरली होती. विवाहास बालगंधर्वांसह कंपनीतील सर्व मंडळी आली होती. हे लग्न त्या वेळच्या परिस्थितीनुसार बऱ्यापैकी झाले. लग्नातील सर्व कार्यक्रम हसत खेळत पार पडले. नाटकात मी ‘ स्त्रीपार्टी ’ करीत असल्याने माझे केस लांब सडक होते. तेव्हा माझ्या मेव्हण्या म्हणायच्या ‘ नागू ’ (माझ्या बायकोचे माहेरचे नाव) तुझ्या नवऱ्याचे केस लांबसडक असल्याने दोघांची न्हाणी आणि दोघांचे बुचडे बांधण्यास काहीच हरकत नाही.

परंतु लग्नाचा हा आनंद फार दिवस टिकला नाही! पुण्यात लवकरच एन्फलुएन्झाची मोठी साथ आली व त्या साथीतच लग्नानंतर अवघ्या पाच महिन्यांनी माझी पत्नी मला अंतरली! त्यावेळी तिचे वय अवघे तेरा वर्षांचे होते.

पत्नीच्या निधनानंतर काही काळ उदास मनःस्थितीत गेला. लग्न होते काय आणि पत्नीचे निधन होते काय. सगळेच अकल्पित!

दुःखाचा भार हलका होताच गंधर्व कंपनीचे कॅशियर श्री. रायकर यांनी तिलकवाडा येथील श्री. आनंदराव बार्शीकर यांना माझ्याबद्दल माहिती सांगितली.

तिलकवाडा हे गाव नर्मदेच्या काठी आहे, तिथे ब्राह्मणाची अशी इन मिन घरे होती. त्यांत बार्शीकरांचे एक! योगायोग असा की सद्गुरु वासुदेवानंद सरस्वती उर्फ टेंबेस्वामी हे नरसोबाची वाडी सोडून नर्मदा तटाकी तिलकवाडा येथे वास्तव्यास आले होते. एका पाराखाली ते राहात व नियमानुसार तीन ब्राह्मणांच्या घरी रोज भिक्षेस जात. त्यावेळी ते बार्शीकरांकडेही येत. एके दिवशी बार्शीकरांच्या मुलीने (माझ्या भावी पत्नीने) महाराजांना रोजच्या प्रमाणे नमस्कार केला. त्यांनी पाटीवर श्रीगणेशायनमः अशी अक्षरे काढून दिली व 'मुली तू भाग्यवान आहेस. असा आशीर्वादही दिला.

तिलकवाडा येथे काही दिवस राहून स्वामी महाराज गरूडेश्वरी कायम वास्तव्यास गेले. बार्शीकरही आपल्या मुलीच्या शिक्षणासाठी तिलकवाड्याहून बडोद्यास आले.

बार्शीकरांनी बडोद्याच्या मुक्कामात माझी नाटके पाहिली होती. 'शारदे'ची भूमिकाही त्यांनी पाहिली होती. त्यांना थोडीफार गाण्याची आवडही होती. माझे स्थळ त्यांना पसंत पडले. कंपनी पुण्यास आल्यावर ते मुलीला दाखविण्यास घेऊन आले.

—परंतु दरम्यान माझ्यावर एक विलक्षण बाका प्रसंग आला.

पुण्यातील विश्रामबाग वाडयाजवळील श्रीमंत कुरुंदवाडकर यांच्या वाडयात गंधर्व कंपनी उतरली असताना मुंबईचे जोशी नावाचे एक गृहस्थ आले. मी लग्नाचा आहे, त्याबाबत काही बोलणी चालू आहेत. असे त्यांना कळले. तेही माझ्या गाण्याचे फार षौकी होते. माझी खाजगी गाणीही त्यांनी ऐकली होती. या जोशांची एक बहीण लग्नाची होती. ती मला द्यावी, अशी त्यांची फार इच्छा होती व ते तसे वारंवार सांगतही. लग्नाबद्दल ते मला विचारीत व मी सांगे– "मातोश्री व बंधूंना विचारून त्यांच्या कलाने ठरवा."

कंपनीचा मुक्काम पुण्यास आहे असे पाहून बडोद्याहून बार्शीकर आपल्या मुलीस व मुंबईहून जोशी आपल्या बहिणीस घेऊन आले. दोघेही कंपनीच्या बिऱ्हाडी उतरले. दोघांना वेगवेगळ्या हॉलमध्ये उतरण्यास जागा देण्यात आली. माझ्या वडील बंधूंची इच्छा होती की मी जोशी यांची बहीण करून घ्यावी– कारण बार्शीकरांची परिस्थिती बेताचीच होती व जोशी हुंडा देणार होते. गुरुवर्य बुवासाहेबांवर माझी भक्ती, श्रद्धा होती. ते सांगतील त्याप्रमाणे निर्णय घ्यायचा असे मी ठरवले. बार्शीकरांची मुलगी करावी, असे बुवांचे मत पडले. दोघांच्या पत्रिकाही उत्तम जुळल्या.

परंतु जोशीबुवांनी नवीनच पवित्रा घेतला. आपली बहीण आणि बार्शीकरांची मुलगी या दोघांशीही लग्न करावे असा त्यांनी आग्रह धरला. एक लग्न पुण्याला करावे व दुसरे आळंदीला उरकावे, अशी त्यांनी तोड काढली. फारच गंभीर प्रसंग माझ्यावर येऊन ठेपला होता. मी काही या गोष्टीला तयार होईना. अखेरीस चिठ्या टाकून निर्णय घ्यावा इथपर्यंत मजल गेली. दोन्ही नावांच्या चिठ्या तयार करण्यात आल्या. एका लहान मुलाने त्यातील एक चिठ्ठी उचलली. आणि त्यात श्री. जोशी यांच्या बहिणीचे नाव निघाले. तथापि हा प्रकार मला मुळीच मंजूर नव्हता. माझे मत आणि गुरुवर्य बुवांचे मत एकच होते. पण चिठ्ठ्या टाकण्याचेही नाटक झाले. मी जोशी यांची हात जोडून प्रार्थना केली आणि त्यांना सांगितले की मला गुरुजींच्या मनाविरुद्ध जाता येत नाही; तेव्हा आपण मला क्षमा करा. त्यांनी मोठ्या कष्टाने ही विनंती मान्य केली. व शेवटी बडोद्याच्या बार्शीकरांच्या मुलीशी माझा द्वितीय विवाह ठरला !

गंधर्व नाटक मंडळीचा जिथे मुक्काम होता; त्या कुरुंदवाडकरांच्या वाड्यातच लग्न व्हायचे ठरले. खर्च करण्याची आमची हिंमत नव्हती. परंतु त्याच वाड्यात एक लग्न नुकतेच पार पडले होते. तेव्हा तो मांडव तसाच ठेवण्यात आला. मांडव, दिव्यांची शोभा अनायासेच मिळाली. जेवणाकरता कंपनीतील आचारी, वाढपी मिळाले. इतर बहुतेक सर्व सोय कंपनीनेच केली होती. मांडव, आरास हे आयते मिळाले. तसेच दागिन्यांचेही ! वधूच्या अंगावर घालण्यासाठी गंधर्व नाटक मंडळीतील स्त्री पार्टीसाठी उपयोगात आणले जाणारे दागिने, गोठपाटल्या, गळ्यातला चंद्रहार आणले होते.

लग्न झाले. त्याच रात्री नाटक असल्याने हे सर्व दागिने परत कंपनीत नेण्यात आले. सारांश, मांडव शोभेचा तसेच दागिनेही ' मांडव–शोभे 'चे होते. या लग्नासाठी मला सुमारे चारशे रुपये खर्च आला. लग्न झाले त्या दिवशी शनिवार होता व रात्री ' स्वयंवर ' नाटक होते. त्यावेळी बालगंधर्व म्हणाले, ' आज रात्री आमचे लग्न आहे, पहाटे तीनच्या सुमारास. ' हे ऐकून मुलीकडील सर्वांना आश्चर्य वाटले. बालगंधर्व इतक्या वयाचे, लग्न झालेले आणि ते असे काय म्हणताहेत हे त्या मंडळींना कळेचना.

विवाह समारंभ आटोपल्यावर बार्शीकर कुटुंबातील बहुतेक सर्व मंडळी परत गेली. विवाहानंतर जो पहिला शनिवार आला त्या दिवशी ' सौभद्र '' नाटक होणार होते. मी सुरुवातीस नटीची आणि नंतर नारदाची भूमिका केली. माझी पत्नी आणि इतर मंडळींना हे नाटक पाहाण्यास बालगंधर्वांनी निमंत्रण दिले होते. ती सर्व मंडळी स्त्रियांच्या गॅलरीत येऊन

बसली. नटीच्या भूमिकेतील वेशभूषा पाहून सर्वजण बुचकळ्यात पडली. त्यांच्याच जवळ अन्य काही महिला बसली मंडळी होती. माझे लग्न झाले असून ही पत्नी आहे हे त्यांना माहीत होते. ' हे तुमचे यजमान बरं ! ' असे मुद्दाम माझ्या पत्नीला ती सांगत.

परंतु नारदाच्या वेषात जेव्हा मी रंगभूमीवर प्रवेश केला तेव्हा त्यांना माझे खरे रूप दिसले. आणि त्यांचा संशय दूर झाला.

नारायणराव मला म्हणायचे, ' नाटक सुटल्यावर ही फुलांची वेणी तू घरी घेऊन जात जा. बायकोला आनंद वाटेल. ती खूष होईल. '

त्यानंतर नाटक संपले की मी दरवेळी फुलांची वेणी घरी घेऊन जात असे !

माझ्या पत्नीला आणि पाठराखणीस राहिलेल्या मंडळीस वाटायचे मुलगा किती चांगला, हौशी आहे. उत्तम फुलांची तो वेणी आणतो ! पण ही नाटकात वापरलेली वेणी आहे याची त्यांना अजिबात कल्पना नसायची.

माझ्या पत्नीचे शिक्षण गुजराती चौथ्या यत्तेपर्यंत झाले होते. ती मराठी साधारण बोलत असे, पण लिहिणे जड जाई. नवीनच असल्यामुळे ती घरात फारशी बोलतही नसे. माझी आई अगदी मोठ्याने आणि सडेतोड बोलायची. इतक्या दूरवरून आलेली माझी पत्नी अवघी तेरा वर्षांची होती. मराठी तितकेसे चांगले येत नसल्याने ती संकोचत असे. तिला प्रसंगी अवघडल्यासारखे वाटे. ती बोलत नाही, हे पाहून आईने एकदा तिच्या घशात उलथन्याचे टोक घालून घसा, जीभ, पडजीभ पाहिली. सर्व काही ठीक आहे, पण ही बोलत का नाही, अशी आईला शंका ! मी आईला सांगितले, ' ती माझ्याशी बोलते. तिला बोलता येते. तू काळजी करू नकोस. " मी म्हणालो, ' तूच जरा तिला सांभाळून घेत जा. आपली राहाण्याची जागाही अशी. त्यात स्वतंत्रता नाही. जुन्या दोन खोल्या. त्यातच स्वयंपाक. तिथेच दळणाचे जाते. मोकळेपणा आहे तरी कोठे ? "
आईला ते पटले. अशा प्रतिकूल परिस्थितीत आम्ही संसारास प्रारंभ केला.

—माझे दुसरे लग्न झाल्यापासून मला उर्जितावस्था येत गेली. आणि याला कारण पत्नीचा पायगुण. तिचा मला पुढे पन्नास वर्षे सहवास लाभला.

× × ×

## ॥ ४ ॥

### भास्करबुवा देहाने गेले खरे, परंतु ते स्वरूपाने माझ्या गळयात कायम राहिले

काश्मीरमध्ये प्रवास करण्याची संधी सन १९१९-२० मध्ये मला अचानक मिळाली.

काश्मीरचे महाराज श्रीमंत प्रतापसिंह महाराज यांचे चिरंजीव श्रीमंत हरिसिंग महाराज यांच्या विवाहाचे निमंत्रण बुवासाहेबांना आले होते. या विवाहासाठी बुवांबरोबर मीसुद्धा गेलो. आमचा मुक्काम रघुनाथ बझारमधील संस्थानचे इंजिनियर श्री. देवस्थळी यांच्याकडे होता. त्यांचा आणि बुवांचा घनिष्ट संबंध होता. तीन एक दिवस देवस्थळाचा पाहुणचार घेतल्यावर आम्ही सरकारी जागेत गेलो. याच मुक्कामात एक विलक्षण घटना घडली. एके दिवशी मुंबईहून आलेल्या टपालात बुवांच्या नावाने एक पत्र आले. त्या पत्रासोबत ' संदेश ' पत्रातील एक कटिंगही हेतुपुरस्सर धाडण्यात आले होते. या कटिंगातील मजकूर पुढीलप्रमाणे होता — ' श्री. गोविंदराव टेंबे यांनी शिवराज नाटक कंपनी काढण्याचे ठरविले असून पं. भास्करबुवांचे शिष्य मास्तर कृष्णराव यांची त्या कंपनीत नायिकेचे काम करण्यासाठी योजना झाली आहे. ' हा मजकूर वाचून बुवांना अतिशय राग आला. त्यांनी मला विचारले, ' मला न कळवता — विचारता तू टेंबे यांच्या कंपनीत जाण्याचे का ठरविलेस ? ' मला यातले काहीसुद्धा माहिती नव्हते. तथापि साधारण कल्पना आली. माझ्या बंधूंचे

आणि टेंब्यांचे यासंबंधात बोलणे झाले असले पाहिजे.

मी बुवांच्या पाया पडलो आणि म्हटले, ‘ यातील मला काहीही माहिती नाही. ’ पण त्यांना ते पटेना. त्यांचा क्रोध इतका अनावर झाला की, त्यांनी मला रागारागाने जिन्यावरून खाली ढकलले. पन्नास रुपये भाड्यासाठी म्हणून माझ्या अंगावर भिरकावले; आणि म्हणाले, ‘चालायला लाग. येथे राहू नकोस. ’

मी रस्त्यावर येऊन रडतच उभा राहिलो. दोन तास तशा स्थितीत काढल्यावर श्री. देवस्थळी यांनी बुवांची समजूत कशीबशी काढली. ‘ तुम्हाला विचारल्याशिवाय कृष्णा अशी गोष्ट कधी करणार नाही. याची तुम्ही खात्री बाळगा. ’ असे त्यांनी सांगताच बुवांचा राग शांत झाला.

पुढे पुण्यास आल्यावर जेव्हा त्यांना खरा प्रकार समजला तेव्हा, त्यांचा माझ्यावरील रोष पूर्णपणे नाहीसा झाला. ‘ कृष्णा, माझ्यावर तुझी श्रद्धा आहे, खरी ’ असे म्हणून त्यांनी माझ्या पाठीवरून हात फिरवला.

हरिसिंग महाराजांचे लग्न चंब्याच्या राजकन्येशी झाले. ते दिवस अतिशय थंडीचे होते. जम्मूहून चंब्याला जाण्यासाठी सुमारे अडीच ते तीन हजार लोक निघाले होते. या सर्वांची प्रवासात उतरण्याची सोय काश्मीरच्या महाराजांनीच केली होती. आम्ही मात्र गुरुवर्य बुवांच्याबरोबर पठाणकोटहून डलहौसीला गेलो व तिथेच मुक्काम केला. चंब्याला जाण्यासाठी बुवांच्याकरिता एक ‘ डंडी ’ होती; आणि आम्हा साथीवाल्यांसाठी घोडी देण्यात आली होती. माझ्या वाट्याला एक काळा पण मद्दड घोडा आला. माझ्या वयाला आणि स्वभावाला अनुरूप असा हा घोडा सावकाश आणि थंडपणे चालावयाचा.

जयपूरचे खाँ अल्लाना बंदे धृपदिये यांना मी यावेळी प्रथमच पाहिले. ते रजपूत पद्धतीचे धोतर आणि पगडी घालत. त्यांचा झोक-नोक फारच असे. पण धृपदी गायकही ते त्याच पट्टीचे होते. बुवांवर त्यांचा फारच लोभ. एकदा बुवासाहेब घोड्याच्या गाडीतून जात असताना खाँ साहेबांची दृष्टिभेट झाली. दोघांनीही आपापल्या गाड्या थांबविल्या. थोडे बोलणेही झाले. एकदा कोठीवर खाँ अल्लाना बंदे यांचे गाणे झाले. त्यांनी त्यावेळी शंकरा रागातील ‘ नोम-थोम ’ सुरू केले व तेच तासभर चालले होते. ते ऐकून बुवासाहेब म्हणाले, ‘ मंद्र मध्यम सप्तकातील हे नोम-थोम ऐकल्यावर बीनचा भास होतो.’ नंतर खाँ साहेब धृपद-धम्मार गायले. काय विचारता त्या गाण्याचा थाट ! एक एक बोलभाट, लयी चंद्राकार आणि आवाजाची लगाई तर फारच सुंदर होती. कलकत्त्याचे प्रसिद्ध गायक ख़ाँ मौजुद्दीखाँ हेही यावेळी आले होते.

गंधर्व नाटक कंपनीत मी कामे करावयास लागलो. माझ्या भूमिका चांगल्या होत असत. १९२१ साल असावे. मी 'विद्याहरण' नाटकात प्रथमच रसिकेची भूमिका केली. पुढे काही वर्षांनी याच नाटकातील नायकाची-कचाची भूमिका मी करू लागलो. काकासाहेब खाडिलकर आणि बुवासाहेब या दोघांनाही खात्री होती की कचाची सर्व पदे मी उत्तम म्हणेन. काही पदे बुवांनी स्वतः बसवून दिली होती.

मी कचाची भूमिका करण्याचे ठरविल्यावर खाडिलकरांना म्हणालो, 'नारायणरावांच्या मानाने मी लहान दिसतो.' त्यांनी सल्ला दिला की, 'उंच खडावा घालत जा म्हणजे झाले.' मी म्हणालो, 'ते तर फारच कठीण. कारण स्टेजवर बोलता बोलता चालू लागलो तर एखादे वेळी आपटेन आणि सगळीच फजिती होईल. पण शुक्राचार्यांच्या पोटात राहाणे मात्र जमेल' असे गमतीने म्हणताच खाडिलकर मनापासून हसले.

कचाची ही पहिली भूमिका मी पुण्याला किर्लोस्कर थिएटरात केली. त्यावेळी खाडिलकर आणि बुवा दोघेही हजर होते. माझ्या अंगाला बरोबर बसतील अशा तीन नवीन कफन्या शिवून घेण्यात आल्या होत्या. कचाच्या भूमिकेतील पदे गाऊन मी तीन–चार 'वन्समोअर' घेतले. 'तेजा नभी' 'लोळत कच' 'सुर सुखखनि तू विमला' ही पदे तर हमखास वन्समोअरची ठरलेलीच.

या नाटकातील पदांच्या रेकॉर्डस एच. एम. व्ही.ने घेतल्या. त्या खूपच लोकप्रिय झाल्या.

आमच्या कंपनीचा गावोगाव मुक्काम होत असे. ठिकठिकाणी प्रयोगास लोकांची 'झिम्मड' उडायची. बडोदे येथे कंपनीचा मुक्काम असताना मला काविळीने पछाडले. तशाही आजारी अवस्थेत मी काम केले. त्यावेळी मला स्टेजवरील दिवे, माणसे आणि पुढील प्रेक्षक सर्व काही पिवळे पिवळे दिसे. काही दिवसांनी मी चांगलाच आजारी पडलो. आणि बडोद्याच्या महाराणी हॉस्पिटलमध्ये ठेवले.

काही दिवस उपचार घेतल्यानंतर विश्रांतीसाठी माथेरान येथे जाण्याचा सल्ला देण्यात आला. माथेरान हे थंड हवेचे ठिकाण. श्रीमंत माणसांनाच तिथे राहाणे परवडणार. मला तर फक्त नव्वद रुपये पगार होता. अशा परिस्थितीत माथेरानला राहाणे कसे काय जमेल याचा मी विचार करू लागलो. चिंता करू लागलो. परंतु माझ्या गाण्यानेच माझी चिंता दूर केली.

मुंबईला कंपनीचा मुक्काम असताना मी एक शिकवणी करीत असे. गावदेवीला 'कुसुम-व्हिला' नावाचा एक बंगला होता. श्रीमान लालदास

मगनलाल हे त्याचे मालक होते. त्यांनी मला गायन शिकवण्यास बोलावले होते. मुंबईत आलो की मी त्यांच्याकडे जात असे. त्याप्रमाणे आमची भेट झाली असताना मी म्हणालो, 'हवापालट करण्यासाठी मी माथेरानला जावे म्हणतो. पण ते माझ्या शक्तीबाहेरचे आहे.' शेटजी म्हणाले, 'आपण मुळीच फिकीर करू नका. माझा तिथे बंगला आहे. आपण तो खुशाल वापरावा.' शेटजींनी त्यांचा माथेरानचा बंगला दिला. तो खूपच मोठा होता. आम्ही तर अवघी चारच माणसे. अंथरूण, पांघरूण व दोन ट्रंका एवढे सामान. एवढा मोठा बंगला देण्यापेक्षा लहान जागा द्यावी असे मी शेटजींना सांगितले. त्यानुसार दोन खोल्या व एक छोटेसे स्वयंपाकघर असलेल्या जागेत आम्ही राहावयास गेलो. आई, पत्नी, बंधू आणि मी असे चौघे जण जवळ जवळ महिनाभर माथेरानला होतो.

१९२२ साली बुवासाहेब आजारी झाले. त्यांच्या परवानगीने मी अमृतसरला गाण्यासाठी गेलो. बुवा काही येऊ शकले नाहीत. माझे गुरुबंधू श्री. बापूराव केतकर माझ्याबरोबर होते. अमृतसरला श्री. शंकराच्या प्राणप्रतिष्ठेसाठी पंडित तोलारामजी यांनी मला बोलाविले होते. पाच सहा दिवस मुक्काम होऊन माझे गाण्याचे कार्यक्रमही झाले. श्री. रखवा हे मला तबला साथीस होते. पुण्यास परतलो, पण कंपनीचा मुक्काम मुंबईस असल्याने मला जावे लागले. बुवांच्या प्रकृतीची काळजी सारखी वाटत होती. म्हणून मी वारंवार पुण्यास येत असे. आजारी असताना बुवांचा मुक्काम डेक्कन जिमखान्यावरील कॉन्ट्रॅक्टर श्री. दत्तोपंत परांजपे यांच्या बंगल्यात होता. एकदा मी बुवांना भेटावयास गेलो होतो. माझी व त्यांची पुन्हा भेट होते की नाही, ही शंका होती. ते म्हणाले, 'कृष्णा, हा भास्करबुवा बरा होऊन पाच सहा तास केव्हा गाईल, असे झाले आहे.' त्यांनी मला जवळ बोलावले. डोक्यावर हात ठेवला. ते म्हणाले, 'माझं मन खूप राखलंस. तुझ्याकरता सोन्याचं शेत लावलंय, खूप गात जा. व खूप खात जा.' त्यानंतर मुंबईला मी नाटकासाठी गेलो. — आणि दुसऱ्याच दिवशी बुवांचे निधन झाले !

मुंबईला ही बातमी कळताच श्री. नारायणराव राजहंस यांनी त्या दिवशीचा खेळ बंद केला. मी आणि बापूराव राजहंस रात्रीच्या गाडीने पुण्याला आलो. ओंकारेश्वरी त्यांच्या दहनभूमीचे दर्शन घेतले, आणि त्यांच्या कुटुंबिय मंडळींना भेटण्यास गेलो.

ज्यांच्या कृपाप्रसादाने मला ही योग्यता प्राप्त झाली, ते गुरुवर्य भास्करबुवा बखले मला कायमचे सोडून गेले. ते देहाने गेले, परंतु स्वररूपाने माझ्या गळ्यात कायम राहिले आहेत. त्यांच्या स्मृतीने अद्यापही मन

उचंबळून येते. आणि मी शांत चित्ताने एकटाच बसतो.

बुवासाहेबांच्या निधनानिमित्त दुखवटा व्यक्त करण्यासाठी मेहुणपुऱ्यातील रास्त्यांच्या दिवाणखान्यात एक शोकसभा झाली. तिचे अध्यक्षस्थान श्री. तात्यासाहेब केळकर यांनी स्वीकारले होते. या शोकसभेत श्री. गोविंदराव टेंबे, श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार, शंकरबुवा अष्टेकर आणि मी यांची भाषणे झाली.

बुवांच्या दहाव्या दिवशी श्रीक्षेत्र माहुली येथे कृष्णा-वेण्या संगमावर कै. बुवासाहेबांचे श्वशुर श्री. देवस्थळी, मुले बाळे आणि इतर नातेवाईक व मी गेलो होतो. बराच वेळ झाला तरी कावळा पिंडाला शिवेना, तेव्हा सर्वांनी मला सांगितले, 'कृष्णा, तू काही तरी बोल' तेव्हा मी भरल्या अंतःकरणाने बोललो, 'गुरुमहाराज, आपली गायनाची इच्छा मी आपल्या आशीर्वादाने पुरी करीन. काळजी करू नका.' अल्पावधीतच कावळा पिंडाला शिवला अत्यंत जड अंतःकरणाने आम्ही सर्वजण परतलो.

मुंबईचे डॉ. सर भालचंद्र भाटवडेकर यांच्या मुलींचे विवाह मुंबईतच साजरे होणार होते. त्या वेळी ग्वाल्हेरचे श्रीमंत माधवराव महाराज शिंदे व त्यांचे सापत्न बंधू श्रीमंत बळवंतराव भैय्या हेसुद्धा आले होते. सर भालचंद्र हे महाराजांचे डॉक्टर होते. विवाहाच्या वेळी गिरगावामध्ये मी व नारायणराव अशा दोघांचेही गायन झाले. त्यावेळी महाराजही उपस्थित होते. किंबहुना त्यांच्या स्वागतासाठीच आम्हा दोघांना गायला बसविले असावे. महाराजांना गाण्याची फारच आवड होती. एवढेच नव्हे, तर ते स्वतः उत्तम गात असत. गणेशोत्सवात ते स्वतः भजन म्हणत.

ग्वाल्हेर संस्थान म्हणजे कलेचे आगर, मोठमोठे गायक, वादक, कलाकार राजदरबारी होते.

सरसाहेबांनी महाराजांशी आमची ओळख करून दिली, त्यांच्या हस्ते मोठ्या काठाची जरीची उपरणी आणि श्रीफल देऊन आमचा सत्कार करण्यात आला. त्याचवेळी गंधर्व नाटक कंपनीला एकदा ग्वाल्हेरला बोलावून घ्यावे असे सरसाहेबांनी म्हणताच महाराजांनी ग्वाल्हेर भेटीचे कंपनीस निमंत्रण दिले.

या निमंत्रणानुसार १९२३-२४ सालातील दिवाळीच्या सुमारास गंधर्व नाटक मंडळी ग्वाल्हेरास गेली. ते दिवस अतिशय थंडीचे होते तरी हवा फारच छान होती. अनेक युरोपिअन लोक पाहुणे म्हणून आलेले होते. ग्वाल्हेर शहर गजबजून गेले होते. ग्वाल्हेरात त्यावेळी 'टाऊन हॉल' नावाचे एक नवे थिएटर बांधले होते. थिएटरची बांधणी अगदी नवीन स्वरूपाची होती. आमच्या नाटकास परदेशी पाहुण्यांची गर्दी

होई. युरोपिअन पाहुण्यांनी गॅलरी खचून भरायची.

काही वेळा राजवाड्यातील हॉलमध्ये नाटके होत असत. या हॉलमध्ये अष्टकोनी लोलकाचे एक खूप मोठे झुंबर होते. इतके मोठे झुंबर पूर्वी मी कधी पाहिले नव्हते. हॉलमध्ये सगळीकडे गादीची बैठक असे. ठिकठिकाणी लोड व तक्के ठेवलेले असत. एका बाजूला स्टेजसाठी जागा ठेवलेली असे. ऑर्केस्ट्रा वगैरे काही नसे. फक्त पडदे व ड्रॉप्स असत. पितळी अगर लोखंडी बारावरून पडदे सरकत. पडदे विविध रंगांचे होते. जंगलाचा 'सीन' झाला की हिरवा पडदा सरके. महालाला गुलाबी पडदा! या हॉलमध्ये आमचे 'स्वयंवर' नाटक उत्तम रंगले.

१९२५ साली गंधर्व नाटक कंपनी 'नंदकुमार' नाटक बसवत होती. या नाटकातील पदांना चाली बसविण्याचे काम माझ्याकडे होते. दरम्यान सिंध प्रांतातील शिकारपूरच्या होळीच्या उत्सवास उपस्थित राहाण्याचे निमंत्रण आले. पूर्वी बुवांच्या बरोबर मी एकदा गेलोच होतो. परंतु त्यांच्या पश्चात अनेक वर्षांनी सिंध प्रांतात जाण्याचा योग आल्याने मी हे निमंत्रण स्वीकारले. माझ्याबरोबर तबल्यासाठी शंकरभैय्या व ऑर्गनसाठी हरिभाऊ देशपांडे होते. माझ्या आगमनाची वार्ता 'सिंध गॅझेट' व स्थानिक वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाली होती.

मी सिंधमध्ये येत असल्याचे वाचून कराचीचे श्रीमंत शेठ लक्ष्मीचंद आणि इतर काही लोकांनी शिकारपूरला येण्याचे ठरविले.

हिज़् मास्टर्स व्हाईस कंपनीने माझ्या गाण्याच्या अनेक ध्वनिमुद्रिका काढल्या होत्या. नाटकातील पदांबरोबर शास्त्रीय गाण्याच्या रेकॉर्डसचाही त्यात समावेश होता.

या रेकॉर्डस खूपच लोकप्रिय झाल्या होत्या. मी एक मोठ्या वयाचा, आकडबाज मिशांचा, बरा गायक असावा अशी लोकांची त्यावरून कल्पना झाली असावी.

शिकारपूर स्टेशनवर माझे भव्य स्वागत करण्यात आले. दुसऱ्याच दिवशी तेथील एका मोठ्या थिएटरात गायनाचा कार्यक्रम झाला. सुरवार, अचकन, डोक्यास जरीचा फेटा असा माझा पोशाख होता. लक्ष्मीचंदांची आणि माझी स्टेजवरच ओळख करून देण्यात आली. शेटजी माझ्यापेक्षा लहान वयाचे होते. माझ्याकडे पाहून ते आपल्या मित्रांना म्हणाले, 'मै समझता था की यह गवैया बडी मूछवाला, बदनसे भी जाडा — मोटा कोई बडा आदमी होगा.'

माझ्याबद्दलची सर्व मंडळींची कल्पना चुकीची ठरली; व त्यांना खूपच आश्चर्य वाटले. गायला बसण्यापूर्वी मला एक पापड खाण्यास देण्यात

आला. थोडेसे पाणी प्यायलो. सभांतून पापड देण्याची तिकडे पद्धत आहे. कोमल ऋषभ आसावरी रागातील ' रा मुझे मन भावे ' या चीजेने मी गाण्यास सुरुवात केली. नंतर द्रुत गायलो.

' नंदकुमार ' नाटक पंधरा दिवसांनी स्टेजवर यायचे असल्याने मी शिकारपूरहून लगेच मुंबईस परतलो.

खाँ रहिमतखाँ यांच्या गाण्याचे ध्वनिमुद्रण करावयाचे ठरले. त्यांना ' भूगंधर्व ' म्हणत असत. खाँसाहेबांचे हे पहिलेच रेकॉर्डिंग होते. रेकॉर्डिंग करणारे एच. एम्. व्ही.चे अधिकारी त्यावेळी युरोपियन होते.

खाँसाहेबांच्या साथीस तंबोरे घेऊन मी व बालगंधर्व बसलो. बळवंतराव रुकडीकर व राजण्णा हे दोघे तबल्याच्या साथीस होते. खाँसाहेबांचा स्वभाव आणि वृत्ती लहान मुलासारखी खेळकर व निष्पाप होती. ध्वनिमुद्रणासाठी आज जसे माईक असतात तसे त्यावेळी कर्णे वापरत. साथीदारांसाठी एक व खाँसाहेबांसाठी एक असे दोन कर्णे आणून ठेवले. फेटा बांधून ते गायला बसले. आपल्या तोंडासमोरील कर्णा पाहून खाँसाहेब म्हणाले, " हमारे मुहके सामने यह क्या लगाया है ? "

आम्ही म्हटले, " खाँसाहेब आप गाईये । आपका गाना इसमेसे सुनने आयेगा ! "

खाँसाहेब गायले. ध्वनिमुद्रण झाले. ते त्यांनी ऐकले. ' यह दुसरा रहिमतखाँ कौन है ? ' असा त्यांनी प्रश्न केला. आपल्यासारखाच हुबेहूब गाणारा दुसरा कोण आहे ? ते चिडले. पण शेवटी त्यांना सर्व काही समजावून सांगण्यात आले.

रेकॉर्डिंग चालू असताना ते मध्येच बोलत. त्यामुळेही खूप घोटाळा होई. ' तुम्ही मध्ये बोलू नका ' असे वारंवार सांगूनही उपयोग होत नसे. त्यांचे गाण्याकडे लक्ष वेधावे म्हणून हिज मास्टर्स व्हाईसच्या कुत्र्याचा ट्रेडमार्क त्यांच्यासमोर ठेवण्यात आला होता. मोठ्या मिनतवारीने दोन दिवसात त्यांच्या गायनाचे ध्वनिमुद्रण पूर्ण करण्यात आले. त्यात खाँ साहेबांनी राग बसंत, होरी, यमन व भैरवी गायली.

× × ×

॥ ५ ॥

## प्रयोग ‘ स्वयंवरा ’चा, पण महाराजांना गाणे हवे होते ‘ सौभद्रा ’तले !

कलावंतांना रसिकांना डावलून चालत नाही. रसिकाने दाद द्यायची, आणि कलावंताने त्याला साद द्यायची ! रसिकाचा अधिक्षेप झाला तर काय प्रसंग ओढवतो याची एक आठवण सांगतो. कंपनीचा मुक्काम अमरावतीला होता. खेळ पाहाण्यास नागपूरचे श्रीमंत लक्ष्मण श्रीधर ऊर्फ बाबुराव देशमुख आपल्या स्नेह्यासमवेत आले होते ! नाटकाच्या दिवशी ते स्वतःच्या गाडीने अमरावतीला येत आणि अगोदरच रिझर्व्ह केलेल्या पहिल्या रांगेतील खुर्चींवर बसत. ‘ एकच प्याला ’चा प्रयोग त्या दिवशी होता. त्यासाठी बाबुरावांनी आठ लोकांची रिझर्व्हेशन्स तारेने केली होती. नाटकास सुरुवात झाली. सिंधूच्या कामातील पहिलेच पद ‘ आजि लागे हृदयी हुरहूर ’ हे नारायणराव राजहंस थोडा वेळ म्हणत असत. त्या दिवशी हे गाणे रंगले. या गाण्याला बाबुराव आणि त्यांच्या स्नेह्यांनी ‘ वन्समोअर ’ दिला. परंतु नारायणरावांनी तिकडे लक्ष दिले नाही. तो न स्वीकारता त्यांनी पुढील वाक्ये म्हणावयास सुरुवात केली. मंडळींचा खूपच विरस झाला. ‘ मानस का बधिरावे ’ हे नारायणरावांचे पुढचे पद सुरू झाले आणि बाबुरावांनी वेगळाच पवित्रा घेतला. कुठल्या तरी नाटकाचे चोपडे तोंडासमोर धरून त्यांनी ते आपण वाचत असल्याचे दाखविले. नारायणरावांच्या पदाकडे जरी त्यांचे लक्ष होते तरी आपण

फारसे लक्ष तिकडे देत नाही, असे इतरांना वाटावे, हा त्यांचा हेतू होता.

पण हा प्रकार पाहून नारायणरावांना बरे वाटेना. आपण मन लावून गात आहोत व पहिल्याच रांगेतील रसिक खुशाल डोळ्यासमोर पुस्तक धरून वाचत आहे, म्हणजे काय? पुस्तकात डोके खुपसून बसणारी ही मंडळी आहेत तरी कोण?

नारायणरावांनी श्री. गंगाधरपंत ओगले यांच्याकडे विचारणा केली. तेव्हा ओगल्यांनी सांगितले, "ते नागपूरचे श्रीमान बाबुराव देशमुख असून, तुमच्या पहिल्या पदाला वन्समोअर देऊनही तुम्ही ते पद न गायल्यामुळे त्यांना राग आलेला आहे." हे ऐकताच नारायणरावांनी देशमुखांना आत येण्यासाठी बोलावणे पाठवले. पण ते काही आले नाहीत. "आत कशाला यायचे? नारायणराव गडबडीत असतील, तेव्हा आत न आलेले बरे." देशमुखांचे हे उत्तर नारायणरावांना गोड वाटले नाही. त्यांनी गंगाधरपंत ओगल्यांनाच विनंती केली, की तुम्ही स्वतः जाऊन बाबुरावांना घेऊन या. बाबुराव अखेरीस आत आले. ते नारायणरावांना म्हणाले, "नारायणराव, आम्ही इतक्या लांबून नाटकासाठी आलो. तुमच्या पदाचा आनंद आम्ही बराच वेळ घेणार आहोत. तुम्ही ऐकवलेत तर आम्हाला आनंद वाटेल. नाहीतर तुमची मर्जी.

नारायणराव अंतःकरणपूर्वक म्हणाले, 'देवा, आपणांसारख्यांना गाणे ऐकवायचे नाही तर कुणाला? आपली सेवा आम्ही जरूर करू.'

या प्रसंगानंतर नारायणराव व देशमुख यांची खूपच मैत्री जमली. नारायणरावांना समजून चुकले की, श्री. बाबुराव देशमुख हे रसिक, गुणग्राही आणि थोर मनाचे आहेत.

श्री. रामभाऊ कुंदगोळकर ऊर्फ सवाई गंधर्व हे त्यावेळच्या परिस्थितीने आणि मनस्थितीने व्यग्र असल्यामुळे बाबुरावांनी त्यांना आपल्याच घरी, नागपूर मुक्कामी ठेवून घेतले होते. तब्येत लागेल त्याप्रमाणे सवाई गंधर्व तिथे गात असत. सवाई गंधर्वांवर बाबुरावांचा फारच लोभ होता. त्यांच्या गाण्यावर ते खूष होते. मी भास्करबुवांचा शिष्य आहे. एवढे श्री. बाबुरावांना माहित होते. पण माझे गाणे ऐकण्याचा योग आलेला नव्हता. गंधर्व नाटक मंडळीतील माझे एक स्नेही श्री. बाळासाहेब बक्षी हे नागपूरचेच राहाणारे. माझे गाणे बाबुरावांनी ऐकावे अशी त्यांची फार इच्छा! म्हणून अमरावतीच्या मुक्कामात बक्षींनी मला एक दिवस नागपूरला नेले आणि गायला बसविले. काही निमंत्रित मंडळींना मुद्दाम पाचारण करण्यात आले होते. तीन-चार तास मी गायलो. बाबुराव खूपच भारावून गेले. ते बक्षींना म्हणाले, 'काय वाटेल ते होवो; पण माझ्या घरी मास्तर कृष्णराव यांचे गायन झालेच

पाहिजे.' बाबुराव बक्षींना म्हणाले, ' नारायणरावांना तार करा आणि तसं कळवा.' त्यानुसार बालगंधर्वांना तार करण्यात आली. बाबुरावांच्या रसिकतेची कल्पना त्यांना पूर्वीच आली होती. त्यांनी तारेनेच आपली अनुमती दिली. आणि बाबुरावांच्या माडीवर माझे गायन झाले. बाबुराव खूष झाले. ते म्हणाले, ' मास्तर, मैफल फार छान रंगविलीत हं ! '

बाबुरावांचा आणि माझा हा असा लोभ जडला !

अमरावतीहून परत येत असताना कंपनीचा मुक्काम नाशिकला झाला. पंचवटी येथे श्री. शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांच्या हस्ते माझा आणि बालगंधर्वांचा सत्कार झाला. माझे गाणे झाले. सत्कार समारंभात भाषण करताना डॉ. कुर्तकोटी म्हणाले, ' बालगंधर्व म्हणजे मूर्तिमंत नाट्य आहे. आणि मास्तर कृष्णराव म्हणजे संगीत कलानिधी आहेत.' त्या वेळी श्री. शंकराचार्यांच्या हस्ते पीठातर्फे मला ' संगीत कलानिधी ' ही पदवी अर्पण करण्यात आली. हा सत्कारसमारंभ संपल्यावर श्री. शंकराचार्यांनी आम्हाला पुन्हा दुसऱ्या दिवशी सकाळी स्नान उरकून मठात येण्यास सांगितले. त्यानुसार आम्ही मठात गेलो. डॉ. कुर्तकोटींनी एका मखमली पेटीतून दोन शंख बाहेर काढले. दोन्ही ' उजवे शंख ' होते. त्यापैकी एक नारायणरावांना आणि दुसरा मला दिला. मला दिलेला शंख उजवा तर आहेच, पण तो मुकुटाकारही आहे. त्याचा वरचा भाग मोत्यासारखा आहे. डॉक्टरसाहेब म्हणाले, ' अडीच हजाराची ही जोडी आहे. आपणा दोघांनाही ती भेट दिली आहे. याची नित्य नेमाने पूजा करा.'

हा शंख अजूनही माझ्याजवळ आहे. मी तो देवघरात ठेवला आहे. ही अमोल भेट मला मिळाली, हे मी माझे भाग्य समजतो.

गंधर्व नाटक मंडळींची ग्वाल्हेरला फेरी असे. राजवाड्यातील फुलबाग पॅलेसमध्ये नाटकाचे प्रयोग होत असत. एकदा ग्वाल्हेर मुक्कामात ' स्वयंवर ' नाटकाचा प्रयोग करण्याचे ठरले. या नाटकात माझ्याकडे दोन कामे होती. एक नटीचे आणि दुसरे महाराणीचे ! स्वतः माधवराव महाराज यांच्यासह नाटकाला अनेक सरदार आलेले होते. नाटकाच्या सुरुवातीसच माझे नटीचे काम. त्यानुसार नेहमीप्रमाणे मी माझे गाणे सुरू केले. इतक्यात महाराजांनी आपल्या ए. डी. सी. ला विचारले, ' ही नटी आहे ना ? ' जेव्हा ' होय ' असे उत्तर मिळाले तेव्हा महाराज म्हणाले, ' तर मग तिला ' वैशाख मास ' हे गाणे म्हणावयास सांगा.' महाराजांची इच्छा माझ्यापर्यंत येऊन पोहोचली. पंचाईत अशी होती की नाटक लावले होते ' स्वयंवर ' आणि महाराज गाणे म्हणायला सांगत होते सौभद्रातले ! नारायणराव राजहंस माझ्याकडे बघू लागले. मी त्यांना खुणावले आणि

' वैशाख मास ' हे गाणे सुरू केले. महाराजांनी नाटके पाहिली नव्हती. परंतु गाणी मात्र वेळोवेळी आणि बरीच ऐकली होती. म्हणूनच नाटक सुरू झाल्याबरोबर त्यांनी त्यांना माहित असलेले ' वैशाख मास ' हे गाणे म्हणावयास सांगितले.

उत्तर हिंदुस्थानातही मराठी नाट्य-संगीताचा प्रभाव किती जबरदस्त होता, हे यावरून दिसून येईल. आमचे नाटक पुढे सुरू झाले. नारायण-राव रुक्मिणी होऊन प्रवेश करते झाले. आणि त्यांनी ' नाथ हा माझा ' हे पद गाण्यास सुरुवात केली. महाराज नेहमी हिंदीच बोलत.

ते म्हणाले, ' क्या यह रुक्मिणी है ? रुक्मिणी हो तो कृष्ण भगवान की ठुमरी गानेको कहो ! '

नारायणरावांपर्यंत ही फर्माईश आल्यावर ते गडबडले. मी विंगमध्ये उभा होतो. सारा प्रकार स्पष्ट कळत होता. ठुमरीसाठी नारायणरावांना योग्य पद आठवेना. शेवटी मी त्यांना हळूच खुणेने ' कृष्ण मुरारी ' ही ठुमरी सुरू करा म्हणून सुचविले. नारायणरावांनी ती गाताच महाराज बेहद्द खूष झाले.

पण आमच्यावर आलेले हे प्रसंग काहीच नाहीत. याहीपेक्षा एक मजेदार प्रसंग घडला.

नाटकात मी ' महाराणी ' होतो आणि देवधर नावाचे नट ज्योतिषी ' होते. नाटकातच हा प्रसंग आहे. मी ज्योतिषाला विचारले, सध्या ग्रहमान कसे आहे ? त्याबरोबर ज्योतिषाने जवळ असलेली पत्रिकेची लांबच लांब भेंडोळी एकदम सर्रकन बाहेर काढली. त्याबरोबर जन्मटिपणाच्या लांबच लांब कागदाचे एक टोक जवळच लोडाला टेकून असलेल्या सरदार पाटणकरांच्या हाती गेले. त्यांना वाटले, हा खराच ज्योतिषी आहे. नाटक मध्येच थांबवून त्यांनी ज्योतिषाला विचारले, ' ज्योतिषीबुवा माझ्या मुलीच्या विवाहाचा योग केव्हा आहे ते सांगता का ? '

हा अनपेक्षित प्रसंग पाहून देवधर बावरले. त्यांच्या लक्षात येईना, हा प्रश्न मध्येच कसा उपटला आणि उत्तर तरी काय द्यायचे. प्रसंग बाका आहे हे ध्यानी घेऊन मी ज्योतिषाला सुचविले की, ' त्यांना सांगा, आता, रुक्मिणीच्या ' स्वयंवरा 'ची गडबड आहे. उद्या पाहू तुमच्या मुलीचा योग. तिच्या लग्नाला अवकाश आहे.' देवधरांनी तशाच थाटांत पाटण-करांना उत्तर दिले. पण प्रकरण एवढ्यावर थांबते कुठे ? सरदार पाटणकर म्हणाले, ' ठीक आहे. उद्या सकाळी मी घोडागाडी पाठवतो आपल्याला न्यायला. आता नाटक चालू द्या पुढे ! ' अशा रीतीने वेळ निभावून गेली. नाटकही लवकर संपले. कारण वन्समोअर वगैरे काहीही नव्हते. ' स्वयंवर '

लवकर संपले म्हणून 'मृच्छकटिक' सुरू केले. तेसुद्धा पावसाच्या देखाव्याशिवाय.

संस्थानिकांच्या गमती सांगायच्या म्हटले तर किती तरी सांगता येतील. असेच एकदा हिज हायनेस गॅलरीत आपल्या युरोपियन मित्रां-समवेत आमचे नाटक पाहाण्यास बसले होते. एक अंक झाल्यावर त्यांच्या मनात काय आले कुणास ठाऊक? ते सरळ रंगपटात आले आणि बाल-गंधर्वांना म्हणाले, 'माझा मेकअप करून मला चांगला गोरा करा.' इतका गोरा की, गॅलरीत जाऊन पुन्हा बसलो तरी कुणाला ओळखता येऊ नये.'

महाराजांची इच्छा. नाही कोण म्हणणार? थोड्याच वेळात महाराजांचा मेकअप झाला. दुसरा अंकही सुरू झाला. आणि ते हळूच गॅलरीत जाऊन बसले. काही वेळात 'महाराज गेले कुठे?' अशी मित्रात कुजबूज सुरू झाली. शेजारी असूनही महाराजांना त्यांनी ओळखले नाही. एवढा बेमालूम मेकअप झाला होता. अखेरीस स्वतः माधवरावांनीच सांगितले, 'आय ॲम हिज हायनेस, दि महाराजा.' हे ऐकून सर्वजण आश्चर्यचकित झाले.

नंतर महाराज रंगपटात आले व म्हणाले, 'का हो रंग पक्का नाही ना? नाही तर वाड्यात गेल्यावर आम्हाला राणीसाहेबही ओळखणार नाहीत. मग प्रवेश बंद व्हायचा!''

अशा प्रकारचे मोकळे आणि आनंदी आतावरण असे. राजे-रजवाड्यांपासून ते अगदी गरीबांपर्यंत नाटके लोकांना आवडत. आणि दोघेही ती सारख्याच तल्लीनतेने पाहात!

गंधर्व नाटक मंडळीने मराठी मनावर कैक वर्षे अधिराज्य गाजवले. १९१३ साली मुंबईला श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या 'मूकनायक' नाटकाने कंपनीने श्रीगणेशा केला. कंपनीच्या पहिल्याच नाटकाच्या उद्घाटनाचा सोहळा अजूनही मला आठवतो. उद्घाटनाला एखाद्या सत्त्वशील माणसालाच बोलवावे असा आग्रह असल्याने डॉ. सर भालचंद्र भाटवडेकर यांना पाचारण करण्यात आले. मुंबईच्या एल्फिन्स्टन थिएटरात हा प्रयोग झाला. उद्घाटनाचे थोडेच भाषण झाले. त्यात डॉ. भाटवडेकर म्हणाले की, नाटक 'मूकनायक' असले तरी ते 'बोलके' आहे. या नाटकात सरोजिनीची भूमिका बालगंधर्वांनी केली होती. नायकाची भूमिका गणपतराव बोडस यांनी वठविली.

१९१५ ते १९३३ या दरम्यानच्या काळात मी गंधर्व नाटक मंडळीत होतो. बालगंधर्व, बोडस आणि गोविंदराव टेंबे असे तिघेजण कंप-

नीचे मालक होते. या अठरा वर्षांच्या काळात मी अनेक स्त्री–पुरुष पात्रांच्या भूमिका केल्या. परंतु प्रत्येक नाटकात नटीचे काम मला करावे लागे. तसा बालगंधर्वांचा आग्रह होता. ते म्हणायचे, “ नांदीचे गाणे उत्तम आवाजात, सुरेल झाले पाहिजे. तुमच्याशिवाय ते काम कोण करणार ? ’ नारायणरावांना ‘ मेकअप ’ करायला वेळ लागत असे. रंगभूषेचे काम लांबले तर निरोप यायचा, ‘ पद चालूच ठेवा.’ लोकांना कंटाळा न येता मी आपला नांदीचे पद म्हणत असे. गंधर्व नाटक मंडळीत असताना मी पुढील नाटकात भूमिका केल्या– स्वयंवर ( रुक्मिणी, नटी, महाराणी ), सौभद्र ( नटी, नारद, कृष्ण ), विद्याहरण ( रसिका, कच ), मेनका ( विश्वामित्र शिष्य बालमूर्ती ), सावित्री ( नारद ), आशानिराशा ( वेडी लंका ), नंदकुमार ( कुब्जा ), अमृतसिद्धी ( मीरेची सासू–चंद्रावती ), विधिलिखित ( वृन्दा ), आणि कान्होपात्रा ( कान्होपात्रेची आई शामाबाई ) या सर्व भूमिका मी नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व यांच्या बरोबर केल्या.

नारायणरावांशी सर्व नात्यांनी मी भूमिका केल्या. शारदा नाटकात आमचे नाते आई-मुलीचे होते. गंधर्व इंदिरांकाकू तर मी शारदा ! ‘ एकच प्याला ’ त वन्संचे नाते. मी सुधाकराची बहीण शरद तर बालगंधर्व सिंधू. ‘ सहचारिणी ’ नाटकात आम्ही दोघेजण बहिणी–वहिणी होतो. शारदेत नारायणराव माझी आई होते. तर स्वयंवरात मी त्यांची आई होतो. त्यांचा वडील होण्याचाही प्रसंग आला. शकुंतलेत मी कण्वची भूमिका केली, तर विद्याहरणात पतीची ! गंधर्व देवयानी व मी कच ! — नारायणराव मला म्हणायचे, “ रंगभूमीवर आपली ही विविध प्रकारची नाती, पण आपले एकच खरे नाते आहे, आणि ते भावाभावाचे ! ’

बालगंधर्व म्हणजे महाराष्ट्राला पडलेले एक गोड स्वप्न होते. त्यांना उपजतच रूपाची आणि आवाजाची देणगी होती. पद रंगवायचे कसे याचा त्यांना उत्तम अंदाज असे. नाटकातील आपल्या भूमिकेशी समरस होण्यासाठी ते अपार मेहनत घेत. उपजत रूपाची देणगी असूनही त्यांनी वाटेल तसे काम निभावून नेले नाही. शास्त्रीय गाण्याची फार मोठी बाजू त्यांच्याजवळ प्रथम नव्हती. परंतु भास्करबुवा आणि नंतर मी अशा दोघांनी त्यांच्यासाठी ज्या रागातील चाली दिल्या त्यांची पूर्ण कल्पना घेऊनच त्यांनी परिश्रम घेतले. म्हणून ते लयीला पक्के झाले. त्रिताल, केरवा, दादरा याला ते पक्के होते. त्यांच्या सारखा केरवा आणि दादरा कुणी म्हटलेला मला आठवत नाही. पुढे जसजसे गाणे वाढले, शास्त्रोक्त संगीताचा व्यासंग वाढला, त्याबरोबर झपताल, एकताल, रूपक या लयींच्या प्रकारातही वाढ

झाली. त्यात ते रंगून जात. नारायणरावांच्या गळयात अद्भुत जादू होती. पद सुरू झाल्यावर ऑर्गन सुरू व्हायचा. ते थांबले तरी सुद्धा ऑर्गन सुरू असायचा. पण त्या ऑर्गनचे सूर ऐकले की अजूनही नारायणराव गाताहेत, असा भास मला व्हायचा. इतके स्वरांचे मीलन होत असे.

हैदराबादला कंपनीचा मुक्काम असताना 'शारदा' नाटकाचा प्रयोग लावण्यात आला. केवळ गाण्यासाठी अनेक मुसलमान रसिक प्रयोगास असत. पद योग्य ठिकाणी तोडून म्हटले नाही तर कसे अनर्थ होतात याचा नमुना त्या दिवशी मला आढळला. 'मूर्तिमंत भीति उभी' या पदातील 'दाखवावयासि मला' ही ओळ नको तिथे तोडून म्हटल्याने वेगळाच अर्थ होत होता. त्या दिवशी माझे काम नव्हते,म्हणून मी बाहेर बसलो होतो. 'इस नाटकमे सिमले के सीन है क्या ?' असा प्रश्न एकाने विचारला. शारदा नाटक आणि त्यात कसला आला आहे सिमल्याचा सीन !—मलाही काही कळेना. मी आत आलो. रंगभूमीवर 'दाखवावयासि मला' ही ओळ घोळून घोळून म्हटली जात होती—पण ती 'दाखवाव्या सिमला' या थाटात ! ते ऐकले अन् डोक्यात लख्ख प्रकाश पडला. मी आत विंगमध्ये गेलो. आणि दुरुस्ती करून घेतली.

कर्नाटकातही मराठी नाटकाला भरपूर गर्दी व्हायची. लोकांना भाषा कळायची नाही, पण गाणी खूप आवडायची, 'मानापमान' नाटकातील धैर्यधर आणि लक्ष्मीधर यांना तेथील लोकांनी 'मानप्पा' आणि 'अपमानप्पा' अशी नावे बहाल केले होती.

कंपनीतील लोकांना निर्भेळ ताजे दूध मिळावे म्हणून म्हशी बाळगल्या होत्या. कंपनीचा मुक्काम हलला की, म्हशींचा कळप वॅगनमधून हलत असे. मात्र कंपनीच्या अगोदर म्हशी हलत. कंपनीचा जिथे खेळ असे तिथे म्हशी पोचल्या की लोक म्हणत 'म्हशी पुढे आल्या. रेडे मागून यायचे आहेत.'

'म्हशी आल्या की कंपनीचे येणे नक्की झाले असे लोक मानीत !

एखादी गोष्ट डोक्यात घेतली म्हणजे ती पुरी करायचीच असा बालगंधर्वांचा हट्ट असे. 'शाकुंतल' नाटकात शकुंतला सासरी जाते या प्रसंगाच्या वेळी झाडे रडतात. लता रडू लागतात आणि शकुंतलेचे लाडके हरिणही रडू लागते. व ते तिच्या पाठीशी लागते. एरव्ही एक लाकडाचे हरिण आम्ही रंगभूमीवर आणून उभे करीत असू. पण प्रवेश अधिक रंगदार व्हावा म्हणून खरोखरीचे हरिण स्टेजवर आणायचे असा हट्ट नारायणरावांचा होता. आणि तो त्यांनी पुरा केला.

'बाळ जाई परतोनी' हे गाणे सुरू झाले. ऑर्गनचे सूर बाहेर

पडताच हरणाने आपले कान टवकारले आणि टुणकन् उडी मारून ते ऑर्गनवाल्याच्या डोक्यावरून सरळ पहिल्या रांगेतल्या प्रेक्षकात घुसले. अशीच गोष्ट स्वयंवराच्या वेळी घडली. रंगभूमीवर खऱ्याखुऱ्या गाई, वासरे दाखवण्यासाठी आणली पण ऑर्गन सुरू होताच ही जनावरे शेपूट वर करून हंबरू लागली व नाटकाचा बेरंग झाला.

अशा प्रकरच्या वास्तवतेचा बालगंधर्वांनी पुढे कधी हट्ट धरला नाही !

× × ×

## ॥ ६ ॥

गांधीजींना वंदे मातरम् ऐकवताच
ते सहज उद्गारले, " बहोत मिठास ! "

नटवर्य गणपतराव बोडस हे गंधर्व नाटक मंडळीचे एक मालक होते. गोविंद बल्लाळ देवलांचे ते पट्टशिष्य होते. बोडस म्हणजे कंपनीचे एक भूषण. उत्तम शरीर-सौष्ठव, पाणीदार टपोरे डोळे आणि स्वच्छ वाणी यांची त्यांना ईश्वरदत्त देणगी होती. मृच्छकटिकातील शकार, विद्याहरणातील शिष्यवर, मानापमानातील लक्ष्मीधर आणि संशयकल्लोळातील फाल्गुनराव या त्यांच्या हातखंडा भूमिका होत्या. विशेषतः फाल्गुनरावाची भूमिका ते इतक्या तन्मयतेने करीत असत की फाल्गुनराव म्हणजेच बोडस असे समीकरण होऊन बसले होते.

कंपनीतील नटांना स्त्री आणि पुरुष भूमिका ते फार चांगल्या प्रकारे शिकवित. नाटकाच्या नकलेव्यतिरिक्त जर पात्रांना स्वतःच्या पदरचे वाक्य केवळ प्रेक्षकांना हसविण्यासाठी म्हटले तर त्यांना ते बिलकूल सहन होत नसे. नटांनी आपली नक्कल चोख पाठ करण्यावरही त्यांचा कटाक्ष असे. ते स्वतः जरी गद्य नट असले तरी संगीत भूमिकाही त्यांनी तितक्याच तोलाने केल्या. नाटकातील भूमिका नटांना समजावून सांगण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. ' शापसंभ्रम ' मध्ये मी महाश्वेतेची भूमिका केली होती. ती त्यांनी मला अप्रतिम शिकविली. रंगभूमीवर नटाने कसे उभे राहावे, कसे चालावे, फार काय भूमिकेला शोभतील एवढेच हातवारे कसे

करावेत इत्यादी बारीकसारीक तपशिलांकडे ते लक्ष देत. हे करीत असताना नटांच्या आवाजाकडेही ( टोनिंग ) त्यांची नजर असे. देवलांचे सर्व गुण त्यांच्यात पूर्णांशाने उतरले होते. प्रत्येक गोष्ट वेळच्या वेळी शिस्तशीर करणे व्यवहारदक्ष स्वभाव यामुळे कंपनीत त्यांचा दरारा असे. नारायणराव राजहंस आणि गणपतराव बोडस ही कंपनीची मोठी आकर्षणे होती.

गंधर्व नाटक मंडळींत दत्तोपंत पेठकर, जगन्नाथबुवा पंढरपूरकर, विनायकबुवा पटवर्धन, माधवराव वालावलकर, गंगाधरपंत लोंढे हे प्रमुख संगीत नट होते. ते गायकाची भूमिका करीत, तर सदूभाऊ रानडे, महादेवराव अभ्यंकर, यशवंतराव आठवले हे गद्य नट होते. देवधर आणि भांडारकर विनोदी कामे करीत असत. भांडारकरांची तळीरामाची भूमिका त्या काळी खूपच गाजली होती. केशवराव कांबळे, हरिभाऊ देशपांडे, दत्तोबा जंगम हे ऑर्गनला. कादर-बक्ष, गफूर, महमद हुसेन सारंगीला आणि राजण्णा, बस्ताद पटवर्धन व तबला नवाज तिरखवाँ तबल्याच्या साथीला असत.

कंपनीत मी ६० रुपयांवर लागलो आणि अखेरपर्यंत १३० रुपयांवर स्थिरावलो. माझ्या मागून आलेल्या लोकांना माझ्यापेक्षाही जास्त पगार होता. पण मी कधीच त्याबद्दल तक्रार केली नाही. याचे कारण बालगंधर्वांचा स्वभाव. मालक असून त्यांनी ' मालकी ' अधिकार कधीच गाजवला नाही. शिवाय भास्करबुवांच्यामुळे आमचे नातेही गुरुबंधूंचे ! या संबंधाला बाध येऊ द्यायचा नाही. हे माझे अखेरपर्यंतचे धोरण होते. वेतन कमी असले तरी कंपनीत मी मानाने मोठा होतो. कंपनीतले माझे स्थान लक्षात घेता लोकांना वाटायचे की मला किमान तीनशे–चारशे रुपये पगार असावा. पण तसे काही नव्हते. माझे गाण्याचे कार्यक्रम, मैफली अनेक ठिकाणी होत. महत्त्वाच्या ठिकाणी, राजेरजवाड्यांकडे गाणे असले की तिथे मोठी बिदागी मिळे. या कार्यक्रमांसाठी नारायणरावांची परवानगी असे.

कंपनीत ८० ते १०० लोक असत. जेवणखाण मुक्काम कंपनीतच ! सर्वांत आपलेपणा, जिव्हाळा होता. कंपनी हेच आपले घर अशी प्रत्येकाची भावना होती. आपपर भाव नव्हता. मुसलमान साथीदारांची पंगत वेगळी असे. परंतु आषाढी कार्तिकी अथवा शिवरात्रीला कंपनीत जेवण नसल्याने फराळाचे जिन्नस असत. मुसलमानही आमच्याबरोबर फराळ करीत. सण वार मोठ्या उत्साहाने साजरे होत. त्या दिवशी खास श्रीखंडपुरी, जिलेबी, असे पक्वान्न असे. पगार वेळच्या वेळी म्हणजे पाच किंवा सहा तारखेला मिळायचा.

कंपनीचे खेळ देशभर होत. केवळ मराठीच नव्हे तर पारशी,

गुजराती, मुसलमान असे अन्य भाषिकही नाटकांना गर्दी करत. त्यातल्या त्यात गुजराती आणि भाटिये अधिक संख्येने येत. नारायणरावांचे माधवदास जयसिंग नावाचे एक भाविक होते. मोठ्या श्रद्धेने ते नाटकाला आपल्या मुलाबाळांसह येत. ते भाविक आणि चारित्र्यवान होते. नवीन नाटकाच्या पहिल्या खेळाला तर ते न चुकता येत. नारायणरावांचीही माधवदासांवर भक्ती होती. नवीन नाटक लागले की, त्याची तिकिटविक्री प्रथम माधवदास यांच्या हस्ते होई.

नारायणरावांची प्रकृती बिघडल्याने एक महिना कंपनीला सुटी देण्यात आली. माझी सासुरवाडी बडोद्यालाच असल्याने मी तिकडे गेलो. दरम्यान प्रिन्सेस कमला राजे यांचे लग्न ठरल्याचे व त्यानिमित्त ग्वाल्हेरास येण्याचे निमंत्रण मला मिळाले. लग्नासाठी पाच सहा दिवस राहावे लागेल व त्याप्रीत्यर्थ काय द्यावे लागेल हे कळविण्यास पत्रात लिहिले होते. मी अवश्य येतो. देण्या-घेण्याचे बोलत नाही– ‘ इच्छेला येईल ते द्या ’ असे मी उत्तर बडोद्याहूनच पाठविले.

ग्वाल्हेरास जाताना माझ्याबरोबर माझे शिष्य माणिक ठाकूरदास गुरुबंधु गणपतबुवा पुरोहित आणि माझे धाकटे बंधू रामभाऊ होते. सहा दिवसांच्या मुक्कामात चार वेळा गायन झाले. त्याचे प्रत्येकी पाचशे रुपयांप्रमाणे दोन हजार रुपये मला मिळाले.

सुटी संपवून कंपनी सोलापुरास खेळ करण्यासाठी गेली. मेकॅनिकी थिएटरात प्रयोग धुमधडाक्याने सुरू झाले. सोलापूर मुक्कामी वसंत शांताराम देसाई यांचे ‘ अमृतसिद्धी ’ नाटक प्रथमच होणार होते. त्याशिवाय अन्य दोन तीन प्रयोगात मी भूमिका केल्या.

याच मुक्कामात मी गंधर्व नाटक मंडळी सोडण्याचा निर्णय घेतला.

‘ माझ्या घरच्या अडचणी आहेत, तेव्हा यापुढे कंपनीत राहाणे मला जमणार नाही ’ असे मी नारायणरावांना सांगितले.

नारायणरावांना वाईट वाटले. तेव्हा मीच म्हणालो, ‘ अडचण संपली की मी जरूर परत येईन. ’

मी तडक सोलापूर सोडले. आणि पुण्यास आलो. कारण दुसऱ्याच दिवशी डॉ. बापूसाहेब गाडगीळ यांच्याकडे माझ्या गाण्याचा कार्यक्रम होता.

आयुष्यातील जवळजवळ १९–२० वर्षे मी गंधर्व नाटक मंडळीत काढली. माझ्या आयुष्यातला हा फार महत्त्वाचा आणि आनंदाचा कालखंड गंधर्व नाटक मडळीत गेला. मला उत्तम संस्था मिळत गेल्या, भास्करबुवांसारखा गुरू लाभला. हे मी भाग्याचं लक्षण समजतो.

व्यक्तीच्या जीवनात काही प्रसंग अतिशय महत्वाचे असतात. तसेच माझेही आहे. महात्मा गांधींशी बोलण्याचे, त्यांना माझे गाणे ऐकण्याचे भाग्य मला लाभले-मी त्यांच्याशी अनेक वेळा बोललो- भेटलो.

शस्त्रक्रिया झाल्यानंतर महात्माजी विश्रांतीसाठी मुंबईला आले होते. जुहू बीचवरील एका बंगल्यात त्यांचा मुक्काम होता. ही संधी साधून मी त्यांना भेटावयास गेलो. माझ्याबरोबर सौ. अवंतिकाबाई गोखले होत्या. बंगल्यासमोरच समुद्र किनारा होता. महात्माजींची सायंप्रार्थना याच ठिकाणी होत असे. आम्ही भेटावयास गेलो तेव्हा प्रार्थनेचीच वेळ होती. ओळख वगैरे झाल्यावर मला एखादा अभंग-भजन म्हणण्यास सांगितले. मी म्हटले. त्यांना ते आवडले. वंदेमातरम्ला मी नुकतीच चाल लावली होती. ती त्यांनी ऐकावी अशी माझी इच्छा होती. प्रार्थनेच्या शेवटी 'वंदेमातरम्' गायले जात नसे. पण त्या दिवशी त्यांनी आपणहून 'वंदेमातरम्' म्हणण्यास मला सांगितले. 'बहोत मिठास' असा त्यांनी शेराही व्यक्त केला.

यानंतर आणखी एकदा मी जुहू मुक्कामी महात्माजींना भेटण्यास गेलो. राग वसंतातील एक चीज मी गाऊन दाखविली. 'जपिया नाम जाकोजी निरंकार निर्भय नारायण परब्रम्ह परमेश्वर स्वामी!' श्री जयरामदास दौलतराम जवळच होते. त्यांना ही चीज फार आवडली.

महात्माजी ओझरते म्हणाले, 'या रागातले भजन मी नुकतेच ऐकले होते. पण त्यापेक्षा आपल्या कंठमाधुर्यामुळे आजचे भजन मला विशेष आवडले.'

त्यांनी कस्तुरबांना सांगितले, 'काही फळे आणून द्या.' बांनी थाळीतून फळे आणली आणि मला खायला दिली. मी त्यांना नमस्कार केला आणि घरी आलो.

गावदेवी येथील 'मणिभुवन' येथे महात्माजी कधी कधी उतरत. त्याही वेळेला मी त्यांच्या दर्शनार्थ जात असे.

प्रकृती सुधारण्यासाठी मी महाबळेश्वर पाचगणीला मधून मधून जात असे. योगायोगाची गोष्ट अशी की, महाबळेश्वरला महात्माजींचा मुक्काम असायला व मी तिथे जायला एकच गाठ पडली!

'मुरारजी कॅसल' या बंगल्यात त्यांचा मुक्काम होता. या बंगल्यात एक हौद होता. त्याचे पाणी अप्रतीम होते. पाणी नेण्यासाठी लोकांची गर्दी व्हायची म्हणून हौदाला एक 'गोमुख' केले होते. बंगल्याभोवती प्रशस्त आवार होते. सुंदर बगिचा होता.

एके दिवशी प्रार्थनेच्या अगोदर मी महात्माजींना भेटलो. मला

पाहाताच ते आश्चर्यचकित झाले. ' यहाँ भी तुम ? " असा त्यांनी प्रश्न केला. मी म्हणालो, ' घरवालीके साथ आया हूँ ।

' रोज प्रार्थनेच्या वेळी येत जा ' असे गांधीजी म्हणाले. बंगल्याच्या बाहेर मोकळी जागा होती तिथे प्रार्थना होई. मी रोज जात असे. ' मराठी संतांचे अभंग प्रार्थनेच्या वेळी ऐकवत जा ' असे त्यांनी सांगितले होते. ज्ञानेश्वर, तुकाराम, कान्होपात्रा, सोपानदेव या संतांचे अभंग तसेच मीराबाई, सुरदास यांची भजने मी नेमाने म्हणत असे. साथ संगत काहीच नसायची, तरीपण गाणे रंगायचे. महात्माजी मध्यभागी बसायचे. एका बाजूला कनू गांधी व एका बाजूला मी बसत असे. माझी पत्नीही प्रार्थनेला येत असे. सात आठ दिवस मी गेलो. या वास्तव्यामुळे बापूजींशी माझा दृढ परिचय झाला.

माझे कराचीचे मित्र लाला लखमीचंद हे अमेरिकेला जाण्याचा बेत रचीत होते. ते मलाही घेऊन जाणार होते. अमेरिकेत जायचे तर काही शिफारसपत्रे, ओळखपत्रे हवीत — या हेतूने मी काही प्रमुख मंडळींच्या भेटीस जात असे. महाबळेश्वरच्या भेटीनंतर महात्माजींना मी मणिभुवनात दोन वेळा भेटलो. एकदा तिथे बापूजी अणे व दुसऱ्यांदा विजापूरचे श्रीनिवासराव कौजलगी होते. अमेरिकेला जाण्याच्या संदर्भात मी बापूजींची स्वतंत्रपणे भेट घेतली.

मला अमेरिकेला जाण्याचा योग आलेला आहे. कराचीचे शेट लखमीचंद यांच्याबरोबर मी जाणार आहे. तेव्हा मला एक प्रशस्तिपत्र द्यावे. थोरामोठ्यांच्या भेटी — ओळखी होण्याच्या दृष्टीने त्याचा फार उपयोग होईल.' मी गांधीजींना म्हणालो — काहीशा विनोदाने ते म्हणाले, " लोक म्हणतील, महात्माजींना गाणे कधी समजायला लागेल ? दुसरे एखादे नाव लक्षात असेल तर पहा."

सर विश्वेश्वर अय्यांना भेटण्याचा त्यांनी मला सल्ला दिला. ' मी त्यांना एकदाच पाहिलेले आहे. फारशी ओळख नाही ' असे म्हणालो. अखेरीस तिथेच जवळ असलेल्या प्यारेलाल का कुणीतरी रवींद्रनाथ टागोर यांचे नाव सुचवले. ' टागोरांचा तुम्हाला चांगला उपयोग होईल ' असे गांधीजींचे म्हणणे पडले; पण टागोरांशीही माझी ओळख नव्हती. हे प्रकरण तिथेच अडले.

इच्छा असल्यावर मार्ग दिसतो. गुरुदेव टागोरांची काही नाटके मुंबईत ' एक्सलसिअर ' थिएटरला लागली होती. रवींद्रनाथांची भेट घेण्यास मी उत्सुक आहे हे सरोजिनीदेवी नायडूंना माहिती होते. त्यांनी

मला नाटकास बोलाविले— पासही दिला. नाटकाच्या वेळी रवींद्रनाथांची ओझरती भेट झाली.

आझाद मैदानाजवळील एका निवासस्थानी गुरुदेवांचा मुक्काम होता. तिथे येण्यासंबंधी त्यांनी आम्हाला सांगितले होते. सरोजिनीदेवींच्या मोटारीने आम्ही गुरुदेवांकडे गेलो. माझी ओळख करून देण्यात आली. "मी एक फार मोठा उत्तम गवई आहे" असे नायडूंनी गुरूदेवांना सांगितले.

मी माझ्या अमेरिकेच्या नियोजित भेटीची माहिती सांगितली व प्रशस्तिपत्रक मागितले. "तुम्ही कधी शांतिनिकेतनला आलेला आहात काय ?"

"नाही"— मी म्हणालो.

"तिथं या एकदा—म्हणजे अन्य काही ओळखी संबंधीही मी तुम्हाला पत्रे देईन" गुरुदेव म्हणाले.

माझे दुर्दैव असे की ही खटपट सुरू असतानाच शेट लखमीचंद अचानक निधन पावले. अवघ्या चौतिसाव्या वर्षी माझ्या या कर्तृत्ववान मित्राचे निधन झाले,याचे मला फार वाईट वाटले. माझा अमेरिकेला जाण्याचा बेतही त्यामुळे रद्द झाला.

ते १९३० साल असावे. मी इंदूरला जाण्यापूर्वी पुण्याला किर्लोस्कर थिएटरमध्ये जलसा झाला; त्यात मी गायलो. गंधर्व नाटक मंडळी इंदूरला जाण्यास पूर्वीच निघाली होती. जलसा उरकून मी नंतर निघालो. 'इंदूरला जाण्यासाठी मी निघालो आहे, तुम्हीही या' अशी तार मी कराचीचे श्रीमंत शेट लक्ष्मीचंदजी यांना केली. ते स्वतःच्या गाडीने निघाले आणि खांडव्याला येऊन थांबले. रेल्वेने मी उशिरा येईन, असे त्यांना वाटले. तेव्हा खांडव्याहून मोटारने गेल्यास इंदूरला लवकर पोहोचू, असा त्यांचा विचार होता. नियोजित कार्यक्रमानुसार मी व लालजी मोटारने जाण्यास निघालो. वाटेत मोरक्का गाव लागले आणि नर्मदेचे दर्शनही घडले. मी लालजींना म्हटले, 'शेटजी, इतक्या जवळ आपण आलो आहोत, नर्मदास्नान तर करू या आणि ओंकारेश्वर, ज्योतिर्लिंगाचे दर्शन घेऊ या.' शेटजी ठीक आहे, असे म्हणाले.

आम्ही मोटार उभी केली. नर्मदा स्नान केले. पाण्याचा गडवा भरून घेतला व ज्योतिर्लिंगाला स्नान घातले. नर्मदा पार करण्यासाठी आम्ही नावेत बसलो. त्यापूर्वी आम्ही एक बेलाची टोपली घेतली. वास्तविक हा बेल तीन-चार आण्यांचा होता. परंतु काहीही न ठरवता लालजींनी त्यास एक रुपया दिला. नर्मदामाईच्या दर्शनाला आलेले यात्रेकरू पै-पैसा

नर्मदेला अर्पण करत व हे पैसे काढण्यासाठी तेथे असलेली मुले पोहत, डुब्या मारत, हे पाहून लालाजी त्यांना म्हणाले, 'इतनी तकलीफ मत उठाना' आणि त्यांनी मुलांना रुपये वाटले. शिवाय मिठाई खाण्यास दिली. नर्मदेचे पाणी अतिशय स्वच्छ, पारदर्शक, त्यामुळे नदीत टाकलेले पैसेसुद्धा अगदी स्पष्ट दिसत.

नर्मदा नदी पार करून शंकराला अभिषेक करण्यासाठी आम्ही पायऱ्या चढून वर गेलो. तिथे काही पुजारी होतेच. तिथे बराच वेळ जाणार असे पाहून लालाजी जरा चिडूनच म्हणाले, 'इंदूरला लवकर पोचावे म्हणून मी मुद्दाम मोटार आणली. आणि येथे तुम्ही पूजा कसली करत बसलात?' ते पुजाऱ्यांना उद्देशून म्हणाले, 'ओ महाराज, आपको मैं दस रुपये देता हूँ, लेकिन हमारे मास्टरजीको जल्दीसे मुक्त करना.'

मी शंकरावर धार धरली आणि लालाजींनी मंत्र म्हणणाऱ्या महाराजांवर "धार" धरली! पूजा, अभिषेक आवरून आम्ही इंदुरास निघालो, कंपनीबरोबर माझी पत्नी अगोदरच येऊन पोहोचली होती. जुना तोफखाना भागात मला एक स्वतंत्र ब्लॉक देण्यात आला.

एकदा हुकूमचंद लालाजींना म्हणाले, "जिनके लिये आप कराचीसे इंदौर आये वो मास्टर कृष्णराव कौन है। जरा उनका गाना तो सुनाओ सही!"

"लगेच त्याच रात्री लालाजींनी मला गाण्यास बसविले. तो आडवार असल्याने नाटक नव्हते. दिवाणखान्यात थेट हुकूमचंद एका लाकडी चौथऱ्यावरील एका गद्देल्याला टेकून बसले होते. शेजारीच दोन मखमलीच्या खुर्च्या होत्या. त्यांपैकी एका खुर्चीवर त्यांचे चिरंजीव राजकुमार बसले होते. इतर सर्वजण गालिच्यावर बसले होते. मी हॉलमध्ये प्रवेश केला. लालाजी माझ्या डाव्या बाजूलाच खाली बसले.

"आपण खुर्चीवर बसा" असे शेटजींनी सुचविताच लालजी म्हणाले, "मास्तरांच्या गाण्याच्या वेळी खालीच बसतो. कारण मी त्यांना गुरुसमान मानतो."

शेटजी थोडेसे ओशाळल्यागत झाले. त्यांनी उच्चस्थानी बसलेल्या राजकुमारांनाही खाली बसण्यास लावले. शेटजींना शास्त्रीय संगीताची विशेष आवड नसावी, असे मला दिसले म्हणून बैठकीत रंग भरेल अशी गाणी म्हणण्यास मी सुरुवात केली. "कृष्ण, मुरारी, विनती करत कर हरि" या पदानंतर "शामसुंदर की देख सुरतीया" ही ठुमरी म्हटली.

शेटजींच्या गद्देल्याजवळ दोन भल्या मोठ्या टोपल्या होत्या. एका टोपलीत फळफळावर आणि दुसरीत बदाम पिस्ते असा सुका मेवा होता.

गाणे चालू असताना मधून मधून त्यांचा खुराक चालू होता. व खुराक चालू असताना जवळच असलेल्या टेलिफोनवरून ते काही आकडे उच्चारीत. एकदा ते 'तीनशे साठ' म्हणाले. मला वाटले ही आपली बिदागी असावी. पण पुन्हा ते 'दोनशे चाळीस' हा आकडा उच्चारल्याचे मी ऐकले ! मला वाटले आपला भाव उतरला. परंतु नंतर मला कळले की, शेटजी गाणे चालू असतानाच दुसरीकडे शेअर्सचे वायदे करीत होते !

गायनाच्या वेळी मी डोकीस फेटा बांधला होता. थोड्या वेळाने तो काढला आणि पुन्हा बांधला. त्या वेळी माझे लांबलचक केस व त्याचा बांधलेला बुचडा पाहून शेटजींनी लालजींना विचारले, 'क्या ये नृत्य करते है ?' लालाजींनी त्या वेळी मोठे मार्मिक उत्तर दिले. ते म्हणाले, 'महाराज, ये खुद नाचते नही, बल्कि अपने गानेसे दुसरोंको नचाते है !'

माझे केस व बुचडा पाहिल्यावर शेटजींनी त्यांच्या मुनीमजींना मराठी वाणाची नऊ वारी साडी आणण्यास सांगितले. पण तो गंमतीचा भाग होता. अखेरीस गाणे संपल्यावर मला कटोऱ्या वाट्या, चांदीचा एक लोटा व चमचे दिले. पण मी त्यांना स्पर्श केला नाही. केवळ लालाजींच्या इच्छेसाठी गायलो असे स्पष्टपणे सांगितले व त्या वस्तू घेतल्या नाहीत !

एवढ्या किंमती वस्तू नाकारणारा हा अजब पण स्वाभिमानी गवई पाहून शेटजींना आश्चर्य वाटल्यास नवल नाही !

× × ×

## ॥ ७ ॥

### अघटित, अद्‌भुत प्रसंगांनी भरलेला माझा चित्रपट-सृष्टीतील ‘ प्रभात ’ –काल

सुमारे एकोणीस वीस वर्षांची गंधर्व नाटक मंडळीतील प्रदीर्घ कारकीर्द मी संपविली. पुण्यास काही दिवस मी घरीच होतो. एका महान कंपनीतून दुसऱ्या महान कंपनीत आपले लवकरच पदार्पण होणार आहे, याची मनाला आजिबात कल्पना नव्हती.

मी गंधर्व कंपनी सोडल्याचे शांतारामबापूंना कळले होते. मी ‘ प्रभात ’मध्ये काम करण्यास राजी होईन का हे पहाण्यासाठी त्यांनी आपल्या बंधुंना – दादासाहेबांना– मजकडे पाठविले. त्यानुसार आमची प्राथमिक बोलणी झाली. –आणि शांतारामबापूंनी मला भेटीस बोलाविले. ‘ प्रभात ’मध्ये संगीत दिग्दर्शक म्हणून मी यावे, अशी आपली इच्छा असल्याचे त्यांनी मला बोलून दाखविले. ही आमची पहिली बैठक.

दरम्यान आणखी काही गोष्टी घडून आल्या. एकनाथ महाराजांच्या जीवनावर एक चित्रपट काढण्याची ‘ प्रभात ’ने योजना आखली व प्रमुख भूमिकेसाठी नटसम्राट बालगंधर्व यांची निवड करण्यात आली. त्यासंबंधी वाटाघाटी चालू असताना बालगंधर्व म्हणाले, “ मला संगीत दिग्दर्शक म्हणून मास्तर कृष्णरावच हवे आहेत. त्यांनी माझा गळा ओळखला आहे.’

त्यावेळी नारायणरावांच्या बरोबर त्यांचे बंधू बापूराव राजहंस आले होते. “ आता तुम्हाला सोडून आम्हाला जाता येणार नाही.” असे ते

म्हणाले. त्यामुळे मी ' प्रभात 'मध्ये यावे, या गोष्टीला जोर आला. त्यानंतर शांतारामबापू व मी अशा दोघांची आणखी एक बैठक झाली. शांतारामबापूंनी माझे ' मानापमान ' नाटक पाहिले होते. माझा संगीत आणि अभिनयाचा अनुभवही त्यांना माहीत होता. अखेरच्या बैठकीच्या वेळी मी श्री. वसंत शांताराम देसाई यांना बरोबर नेले. श्री. फत्तेलाल, दामले इत्यादी मंडळी त्यावेळी होती. काही बोलणे झाल्यावर शांतारामबापू व फत्तेलाल मला म्हणाले, " मास्तर, एखादं गाणं म्हणा ना ! " मग मी ' मारा, रघुवीर रे ' हे भजन म्हटले. ते भजन, त्याची चाल सर्वांना अतिशय आवडली. हीच चाल ' धर्मात्मा 'मध्ये घाला असा त्यांचा आग्रह पडला. मी होकार दिला. ( याच चित्रपटात एकनाथाच्या बायकोच्या तोंडी " जीवा तळमळशी, पुत्रासाठी अजुन कशाला विरहाने.... " या गाण्याच्या प्रसंगी मी ही चाल वापरली. )

पाडव्याच्या मुहूर्तावर मी माझे ' प्रभात 'शी कॉन्ट्रॅक्ट केले. आणि रंगभूमीवरून चित्रपटसृष्टीत पदार्पण केले. एका महान कंपनीतून दुसऱ्या एका महान कंपनीत प्रवेश केला. सगळेच अघटित– आणि म्हणूनच अद्भुत ! असे काही घडणार असे कुणी जर भाकित केले असते तर माझ्याबरोबरच इतर अन्य कुणाचाही विश्वास बसला नसता. पण ते घडले ! '

या ' येण्यात ' पदार्पण करण्यात आणखी एक मौज होती. योगायोग होता. मी गंधर्व कंपनी सोडली आणि चित्रपट कंपनीत आलो. पण गंधर्वांचा आणि अन्य ' मंडळीं 'चा पाठपुरावा काही सुटला नाही. ' धर्मात्म्याच्या ' प्रमुख भूमिकेसाठी ' बालगंधर्व ' आले. संगीत दिग्दर्शक म्हणून गंधर्व नाटक कंपनीतीलच माझ्यासारख्या गायक नटाची निवड झाली. बालगंधर्वांना साथ करण्यासाठी कंपनीतले थिरकवा, कादरबक्ष, हरिभाऊ देशपांडे ही मंडळीही आली. सारांश, गंधर्व नाटक कंपनीचा गोतावळा योगायोगाने म्हणा वा अन्य कशाने म्हणा, प्रभात फिल्म कंपनीत दाखल झाला.

अगोदर तयार असलेल्या पदांना चाल लावण्याची त्या वेळी पद्धत नव्हती. संगीत दिग्दर्शक प्रथम चाल तयार करायचे व त्यावरून गीतकार ' पद्य ' निर्माण करावयाचे. मला हीच पद्धत योग्य वाटत होती. मी एक चाल काढायचो, तर गीतकाराच्या डोक्यात वेगळेच ' मीटर ' असायचे– असा काही घोटाळा प्रथम प्रथम होऊ लागला. पण नंतर घडी चांगलीच बसली. चित्रपटातील प्रसंग, वातावरण इत्यादी गोष्टी लक्षात घेऊन चाल काढावी लागे. कवीला मीटर करणे सोपे जावे म्हणून मी मध्ये काही तरी शब्द घालीत असे. कंपनीत अशा रीतीने

रोजच्या रोज गाण्याच्या तालमी सुरू झाल्या. रंगभूमीवर आम्हाला वेळेचे बंधन नव्हते. इथे ते बंधन मिनटा मिनिटाने, नव्हे सेकंदाने पाळावे लागत होते. नारायणरावांच्या तोंडी असलेल्या सर्व पदांच्या चाली त्यांना पसंत पडल्या. एकनाथाच्या पत्नीची भूमिका 'रत्नप्रभा' या नटीने केली होती. तिचाही आवाज गोड, सुरेल होता. मी जेव्हा तिची पदे बसवावयास लागलो, तेव्हा नारायणराव थोडेसे 'नर्व्हस' झाल्याचे दिसले. नाटकात काम करीत असताना कधीही 'स्त्री'शी त्यांचा संबंध आलेला नव्हता. काम करताना तर त्यांचा हा बुजरेपणा अधिकच जाणवत असे. 'बाई' साठी काढलेल्या चाली ऐकून ते अण्णांना-शांतारामबापूंना आम्ही अण्णा म्हणत असू म्हणाले. 'माझ्या चाली बदलल्या पाहिजेत बरं का?'

'का बरं? तुमची भूमिका, गळा हे सारे लक्षात घेऊन मास्तरांनी तुमच्यासाठी चाली दिलेल्या आहेत. बाईचा गळा पाहून बाईसाठी चाली काढलेल्या आहेत.' शांतारामबापू उत्तरले.

तरीपण त्यांचा 'नर्व्हस' पणा कमी झाला नाही. न जाणो ही बाई जास्त भाव खाऊन जायची, म्हणून ते थोडेसे हट्टन बसले. याच वेळी अण्णा खाली आले होते. त्यांच्या ध्यानात एकंदर प्रकार आला. तालमी चालू होत्या, तिथेच ते म्हणाले, 'हं, म्हणा बरं! काय जमत नाही ते आपण बघून घेऊ.'

बालगंधर्वांनी आवाज लावला.

'सब कहते है जिसको नीचा
उसको अमृत देकर सींचा'

'जया म्हणती नीच वर्ण' या नाथांच्या मराठी अभंगाचा अनुवाद नारायणरावांनी उत्तम आवाजात म्हटला. मी मराठी अभंग म्हटला.

अण्णा म्हणाले, 'काय नारायणराव, चाल तर उत्तम आहे. बदल हवा आहे काय?'

नारायणराव काहीच बोलले नाहीत. मग अण्णा रोज तालमीच्या वेळी येऊन बसू लागले. 'माझ्या देखत होऊ देत' असा त्यांचा आग्रह होता. 'यदि चाहो भारत बनजावे। स्वर्गसुख कानन—तुम चंदन हम पानी ।। (मराठीत 'प्रभुची कृति ही सारी') अशा भैरवीपर्यंतच्या गाण्यातील चाली मी बांधल्या. 'प्रभात'चे वातावरण अभंगांच्या स्वरांनी भारून गेले होते. 'भाव तोचि देव' हा नाथांचा अभंग तर कमालीचा लोकप्रिय झाला होता.

चित्रपटाला पार्श्वसंगीत देण्याचा माझा हा पहिलाच प्रसंग. चित्री-

करण पूर्ण झाल्यावर प्रसंगाची लांबी (लेंग्थ), वातावरण पाहून मगच मी संगीत देत असे. आजकाल पार्श्वसंगीताला फार मोठा वाद्यमेळ असतो. त्यामानाने माझ्याकडे फारच थोडे वादक होते. असे असले तरी माझा भर वाद्यांवर नव्हता. सुरावर होता. वादक होते, ते प्रभातच्या कायम नोकरीतील. एखाद्या वेळेला जर जास्त वादक लागले तर ते बाहेरून आणले जात. 'धर्मात्मा' चे पार्श्वसंगीत वेगळे आणि म्हणूनच लोकांच्या मनात भरले. तसा टीकारांनीही उल्लेख केला.

प्रभातचे वातावरण शिस्तशीर असे. मालकाशी माझे संबंध चांगले होते. माझा स्वभाव थोडासा गमत्या व विनोदी असल्याने वातावरणात मोकळेपणा येई. कंपनीतील काम संपले की आम्ही बाहेरच्या बाजूस बसत असू. तिथे मनसोक्त गप्पा व्हायच्या. एरव्ही रोज सकाळी ठीक नऊ वाजता 'म्युझियम रूम'मध्ये गाण्याच्या तालमी व्हायच्या. दुपारी एक वाजता जेवायची सुटी व्हायची. माझं जेवणखाण, फार काय पाणीसुद्धा घरून यायचे. चांदीचा फिरकीचा तांब्या, टिफिन कॅरियर सारे काही व्यवस्थित. कधी कधी शांताराम बापू विनोदाने म्हणायचे, 'का हो मास्तर, तुम्ही इथले पाणी का पीत नाही ? घरून गुलाबपाणी येतं वाटतं ! तसं असेल तर आम्हालाही द्या.'

घरून कधी कधी वांग्याची भाजी यायची. ती सर्वांना आवडायची. अंगतपंगत व्हायची. त्यातही मजा असायची.

माझ्यासाठी एक स्वतंत्र खोली देण्यात आली होती. गाद्या-गिरद्या, लोड-तक्के, टेलिफोन, खुर्च्या यांनी ती सुसज्ज असे. दिमतीला सोपान नावाचा गडी होता. सर्वत्र 'पावित्र्य' कटाक्षाने पाळले जात असे. पादत्राणे घालून म्युझिक रूममध्ये अथवा खोलीत कोणीही जात नसे.

मी डोकीवर नेहमी टोपी घाली. कंपनीतून नुकताच बाहेर पडल्याने डोक्यावर मोठे केस होते. त्याचा मी बुचडा बांधी. ते पाहून एकदा शांतारामबापू म्हणाले, 'मास्तर, हे केस काढून टाका की—'

मी एके दिवशी मनावर घेतले आणि केस काढले. गंगावन म्हणून बायकोने ते गंमत म्हणून जतन करून ठेवले. "तैमुरलंगाच्या या मिशा आहेत, ऐतिहासिकदृष्ट्या त्यांना महत्व असल्याने त्या जतन करून ठेवा" असे मी घरी विनोदाने सांगत असे.

'धर्मात्मा' प्रमाणेच इतर अनेक चित्रपटांतील संगीताबरोबरच माझे टायटल म्युझिकही खूप गाजले. प्रत्येक नावाच्या वेळी मी वेगवेगळे 'पीस' वाजवीत असे. त्यामुळे विविधता येई. 'माणूस' चित्रपटाच्या प्रारंभी जी श्रेयनामावली आहे, तिचा या संदर्भात मला जरूर उल्लेख करावासा वाटतो.

कधी कधी खूप काम केल्याने मनावर ताण पडायचा. मग डोके दुखू लागे. अशा वेळी अण्णा म्हणायचे, ' कृष्णराव, आता काही करू नका. ही गोळी घ्या अन् नंतर थोडी विश्रांती. माझी खात्री आहे की, तुम्ही ' फ्रेश ' झालात की, चाल उत्तम बांधाल. '

मीही चालीला खंबीर होतो. एखादी उत्तम चाल बांधूनही ती पसंत पडली नाही तर मी वेगवेगळ्या प्रकारच्या चार-चार, पाच-पाच चाली नव्याने काढीत असे. मग त्यातली चांगली चाल कोणती यावर वाद सुरू व्हायचा. शांतारामबापूंचा माझ्याबाबत एक आडाखा होता. मी चाल उत्तम बांधली आहे, हे कशावरून ओळखायचे ? शांतारामबापू म्हणायचे, ' ते मास्तरांच्या चेहऱ्यावरूनच तात्काळ दिसते. '

यासंबंधात एक दिवस माझी परीक्षा बघण्याची त्यांना लहर आली. ' अमरज्योती ' मधील एका पदाला मी चाल बांधली होती. माझ्या मते ही चाल सर्वोत्कृष्ट होती. शांतारामबापूंनी एक युक्ती केली...त्यांनी एक भला मोठा टॉवेल माझ्या तोंडावर टाकला. माझ्या चेहऱ्यावरील भाव दिसू नयेत, ही त्यामागील भूमिका होती. ' हं म्हणा, आता ! '

मी चाल म्हटली. ती ऐकून अण्णांना खूपच आनंद झाला. त्यांना वाटले, आपण उगाचच मास्तरांची परीक्षा पाहिली.

' सुनो सुनो बनके प्राणी ' या ' अमरज्योती 'मधील गाजलेल्या गाण्याची ती चाल होती !

' प्रभात 'मध्ये असतानाच मला ' कन्यारत्न ' झाले. हा प्रभातचाच पायगुण आहे म्हणून मुलीचे नाव ' प्रभा ' ठेवा असे अण्णांनी सुचविले. आणि मीही तेच नाव ठेवले. '

विख्यात संगीत दिग्दर्शक श्री. केशवराव भोळे हे माझ्या अगोदरपासून ' प्रभात 'मध्ये होते. त्यांचा वाङ्मयाचा व्यासंगही फार मोठा होता. मी ' प्रभात 'मध्ये आलो—आणि त्यांच्याशी घसट वाढली. ओळखीचे रूपांतर मैत्रीत झाले. ही मैत्री आजतागायत कायम आहे. ' प्रभात ' मध्ये आम्ही एकमेकांच्या चालींचे गुणगान करीत असू. ' माझा मुलगा ' या चित्रपटातील गीतांना श्री. भोळे यांनी फारच छान चाली दिल्या होत्या. विशेषतः ' पाहू रे किती वाट ' ( हिंदीमध्ये ' रावी के उस पार ' ) या गीताला त्यांनी दिलेली चाल अजूनही कानात रेंगाळते आहे. माझी चाल त्यांना आवडली की ते स्वतःहून सांगत.

सुरांच्या साहाय्याने रसपरिपोष केला की, हवा तसा परिणाम घडतो असा माझा अनुभव होता. या ठिकाणी याच संदर्भात ' अमरज्योती ' मधील एक आठवण सांगितल्यास वावगे होणार नाही. ' अरमज्योती 'मध्ये

समुद्राचा ' सीन ' आहे. लहरे आती है । जाती है । टकराती है । ही तीनच वाक्ये एका प्रसंगात होती. पण केवळ संवादांनी हवा तसा परिणाम साधत नव्हता. या वाक्यातील भावना जास्तीत जास्त चांगल्या रीतीने सांगाव्यात म्हणून माझा प्रयत्न होता. केवळ तीन वाद्यांच्या साहाय्याने पार्श्वसंगीत देऊन मी हा परिणाम साधला. समुद्राच्या लाटा येतात, त्या क्षण दोन क्षण थांबतात, परततात,–शांतता होते. हे वाद्यांच्या साहाय्याने प्रतीत केले. हा चित्रपट पाहाण्यास काही इटालियन मंडळी आली होती. वरील ' सीन ' पाहिल्यावर शांतारामबापूंना त्यांनी विचारले, ' हू इज दि म्युझिक डायरेक्टर ? बापूंनी मला त्यांच्यापुढे उभे केले व ओळखही करून दिली.

परदेशी मंडळी आपल्या चित्रपटावर किती खूष असतात याचे दुसरे एक उदाहरण सांगतो. ' वहाँ ' चित्रपट नुकताच प्रकाशित झाला होता. ' वहाँ ' ला इंग्लिश सब टायटल होती; ' बियाँड द होरायझन ' पुण्यास त्यावेळी ट्रॉटमन नावाचे कलेक्टर होते. त्यांनी हा सिनेमा पाहिला होता. माझे काही काम होते, म्हणून मी त्यांना भेटण्यासाठी गेलो. मी पट्टेवाल्याला माझे भेट-कार्ड दिले. ' संगीत दिग्दर्शक, प्रभात फिल्म कंपनी ' ही माझ्या नावाखालील ओळ त्यांनी वाचली आणि शिपाई पाठवून बोलावून घेतले. मी आत गेलो. ट्राटमन मोडकंतोडकं हिंदी बोलू शकत होते.

' वहाँ 'चे संगीत तुमचेच होते का ? ' असा प्रश्न त्यांनी केल्यावर मी ' होय ' म्हणालो. हा चित्रपट आपणास फार आवडला असे त्यांनी सांगितले व त्यांनी माझे कामही केले.

प्रभातमध्ये के. नारायण काळे, राजा नेने, दत्ता धर्माधिकारी, शांताराम आठवले, वसंतराव देसाई या मंडळींशी घनिष्ठ संबंध आला. श्री. शांताराम आठवले हे तर ' प्रभात 'चे कवी आणि सहाय्यक दिग्दर्शक. शांत स्वभाव व कष्ट करण्याची वृत्ती यामुळे मला त्यांच्याबद्दल विशेष जिव्हाळा वाटे. त्यांच्या किती तरी पदांना मी चाली लावल्या. प्रसाद हा त्यांच्या कवितेचा गुण होता. प्रसंगानुरुप साधी, सोपी पण रसपूर्ण पदे करावीत तर ती आठवल्यांनीच. संत वाङ्मयाच्या अभ्यासाने त्यांच्या कवितेत हे गुण आले असावेत, असे जाणवते. माझ्याप्रमाणेच श्री. केशवराव भोळे यांनीही आठवल्यांच्या पदांना चाली लावल्या. त्याही खूपच लोकप्रिय झाल्या. ' गोपाळकृष्ण ', ' शेजारी ' या चित्रपटातील त्यांची गाणी व माझ्या चाली अतिशय गाजल्या.

विख्यात संगीत दिग्दर्शक श्री. वसंतराव देसाई हे व्यक्तित्वही हरहुन्नरी होते. संगीत विभागात असूनही ते बारीक सारीक भूमिका

करीत, गाणी म्हणत. अनेक प्रकारची वाद्ये ते वाजवीत, माझ्या चालींवर ते खूष असत. मला ते गुरुस्थानी मानत असल्याने माझाही त्यांच्यावर लोभ होता. चाली काढताना ते नेहमी माझ्याजवळ बसायचे. ते जरी वादक होते, तरी मी त्यांना माझा सहकारी, सहाय्यक म्हणूनच मानत होतो.

'धर्मात्मा,' 'अमरज्योती,' 'वहाँ,' 'गोपालकृष्ण,' 'माणूस,' 'शेजारी' आणि 'लाखाराणी' या चित्रपटांना मी संगीत दिले. पैकी 'धर्मात्मा,' 'माणूस' आणि 'शेजारी' हे तीन चित्रपट मराठी-प्रमाणेच हिंदी भाषेतही निघाले. त्यामुळे माझी कीर्ती महाराष्ट्राबाहेरही झाली. 'धर्मात्मा'मधील 'आवडीने भावे हरिनाम घेशी,' 'जीवा तळमळशी,' 'कठिण गमे अति व्रत समतेचे,' हास हास, हास बाले, श्रांत चित्त शांत झाले' 'अमरज्योती'मधील आज हमे बन बेहद भाता,' 'अब मैने जाना है' 'सुनो सनो बनके प्राणी' गोपालकृष्णातील 'हासत नाचत जाऊ, जाऊ चला गोकुळाला,' वंदित राधा बाला' 'झर झर झर झर, धार झरे,' 'तुझाच छकुला,' 'भाग्यवती ही कपिला,' 'शेजारी'मधील 'हासत वसंत ये मनी,' 'राधिका चतुर बोले, तुझी माझी प्रीत जुळे' 'लखलख चंदेरी तेजाची दुनिया,' 'सारे प्रवासी घडीचे' आणि 'जिवाचं मैतर तुम्ही माझ्या' ही गाणी महाराष्ट्रात त्यावेळी घरोघर गायली जात होती.

'माणूस' ने तर लोकप्रियतेच्या सर्व मर्यादा ओलांडल्या. 'कशाला उद्याची बात' 'मन पापी भूला' 'आम्ही वळखलं ग' 'प्रेमचि चटणी, प्रेमचि कांदा, प्रेमचि भाकर गोड' ही गाणी अतिशय गाजली. या सर्व चित्रपटांच्या तुलनेने 'लाखाराणी' हे चित्र व्हावे तसे लोकप्रिय झाले नाही.

तुमचे सर्वात आवडते चित्रपट कोणते असे जर कुणी मला विचारले तर मी 'गोपालकृष्ण', 'माणूस' आणि 'शेजारी' हे तीन चित्रपट सांगेन. भारतीय चित्रपटसृष्टीच्या इतिहासातही या तीन नावांना अनन्य-साधारण महत्त्व आहे.

'गोपालकृष्ण', 'शेजारी' आणि 'माणूस' या तीन चित्रांच्या भोवती अनेक आठवणी आजही मनात रेंगाळून आहेत.

'गोपालकृष्ण'च्या वेळचा एक प्रसंग सांगतो. हे चित्र पूर्णपणे तयार झाले होते. परंतु शांतारामबापू एके दिवशी घाईघाईने आले. काही प्राथमिक जुळवाजुळव चालू झाली. आणि ते शांताराम आठवल्यांना म्हणाले, एक संघगीत चित्रित करायचे आहे. गीत हवे आहे. मलाही या

संघगीताला साजेशी चाल बांधण्यास सांगितले. आम्ही चंग बांधला. माझी चाल तयार झाली, तेवढ्याच वेगाने आठवल्यांचे गीतही तयार झाले. आठ तासांत गाणे चालीसह तयार होताच ते अण्णांनी प्रचंड 'मॉब-सीन' सह चित्रितही करून टाकले. अवघ्या दीड दिवसाच्या परिश्रमात एक विलक्षण गीत मराठी चित्रपटाच्या इतिहासात अजरामर झाले. हे गीत होते—

'हासत नाचत जाऊ । जाऊ चला गोकुळाला'

× × ×

## ॥ ८ ॥

---

**आयुष्यातील काही महत्त्वपूर्ण घटना**
**चित्रपटांतून रंगभूमीकडे :**
**' वंदे मातरम् 'साठी यशस्वी लढा**

---

गोपाळकृष्ण चित्रपटाच्या वेळची आणखी एक आठवण. ' गौळणी गे, साजणी गे । थांब जरा ' या गीताला चाल लावत असताना ' थांब जरा ' या ठिकाणी मला हवा तसा ' इफेक्ट ' मिळत नव्हता. मग मी प्रसंग पुन्हा एकदा समजावून घेतला. गवळणी चाललेल्या असतात. कृष्ण भिंतीवर उभा असतो. गवळणी गे, साजणी गे एवढे शब्द तो भिंतीवर उभा असतानाच म्हणतो. ' थांब जरा ' हे म्हणत असताना तो उडी मारतो. उडी मारतानाच्या ' थांब जरा 'त मला ' परिणाम ' दिसावयास हवा होता.

मी घरी आलो; आणि क्षणभर कृष्ण झालो. भिंतीऐवजी खुर्चीवर उभा राहिलो आणि ' थांब जरा ' म्हणून पाहिले. प्रत्यक्ष कृतीनंतर मला हवे ते मिळाले. माझे हे प्रात्यक्षिक माझी मुले– बेबी आणि राजा– पाहतच होती. धावतच ती खाली गेली व आईला म्हणाली, ' आई, बापू बघ कशा उड्या मारीत आहेत.' मी गंमतीने म्हणालो, ' या उड्या ह्या कृष्णासाठी नाहीत, सिनेमातल्या.'

दुसऱ्या दिवशी मी नेहमीप्रमाणे स्टुडिओत गेलो. शांतारामबापू म्हणाले, " काय कृष्णराव, चाल कुठपर्यंत आली.'

मी म्हणालो, ' तयार आहे.'

दामले, फत्तेलाल सर्वच जमा झाले. घरचाच ' सीन ' मी पुन्हा

करून दाखविला. मंडळींची हसून हसून पुरेवाट झाली. शांतारामबापू म्हणाले, ' शंभर टक्के चाल चांगली आहे.'

लहान-सहान गोष्टीतही शांतारामबापू किती बारकाईने लक्ष घालीत याचे अनेक वेळा प्रत्यंतर येई. ' शेजारी 'मध्ये ' हासत वसंत ये वनी ' हे गाणे सुरू होण्यापूर्वी थोडा नृत्याचा प्रसंग आहे. ' वेस्ट एंड 'ला एक इंग्लिश चित्रपट पाहाण्यास गेले असता शांतारामबापूंना त्यातील ' फ्ल्यूट ' चा एक ' पीस ' अतिशय आवडला. त्यांनी तो मला ऐकवला. नृत्यप्रसंगी हा तुकडा वापरावा असे त्यांचे मत पडले.

हा तुकडा न घेता आपण याहीपेक्षा सरस केला तर ? असा माझ्या मनात विचार आला. मी त्या तुकड्याची लांबी, रुंदी अजमावली आणि सात-आठ तास परिश्रम करून बासरीवादनाचा नवा तुकडा काढला. त्याचे ध्वनिमुद्रण करवून घेतले. दोन तुकड्यांपैकी चांगला कोणता, हे ऐकण्यासाठी बापू आले. शिवाय ए. भास्करराव, शांताराम आठवले, राजा नेने ही मंडळीसुद्धा होती. माझाच ' पीस ' उत्तम वाटतो, असा त्यांचा अभिप्राय पडला व ' शेजारी 'त तो वापरलाही !

कुणाचे ऐकून, चालीत मोडतोड, उसनवारी करून आपले घोडे पुढे दामटायचे हे मला तरी पसंत नाही. आजपर्यंतच्या माझ्या संगीत जीवनात ही गोष्ट मी कसोशीने पाळली. मी यशापयशाची पर्वाच केली नाही. पण मला मिळाले ते यशच !

' माणूस 'मधील ' कशाला उद्याची बात ' या गाण्यालाही बरेचसे श्रम घ्यावे लागले. त्याचा एक स्वतंत्र ग्रंथच होईल.

१९४१ मध्ये मी ' प्रभात ' सोडली.

' तुम्ही प्रभात एके प्रभात करीत बसलात, मास्तर. बाहेर असतात तर तुमचा आमचा कधीच संबंध आला असता,' असे भालजी पेंढारकर म्हणाले.

प्रभात सोडल्यावर फार काळ मला बसून राहावे लागले नाही. एके दिवशी आचार्य अत्रे माझ्या घरीच आले. ' मी ' वसंतसेना ' नावाचा एक चित्रपट काढीत आहे. तुम्हीच या चित्राचे संगीत दिग्दर्शन करावे अशी इच्छा आहे,' असे अत्रे म्हणाले व मी होकार दिला. हे चित्र पुरे केले. दरम्यान १९४२ च्या सुमारास व्ही. शांताराम प्रभातमधून बाहेर पडले व त्यांनी स्वतःची ' राजकमल ' कंपनी काढली. एके प्रसंगी त्यांची व माझी मुंबईत ओझरती गाठ पडली.

" कृष्णराव, काय करताहात हल्ली ? ' त्यांनी प्रश्न केला.

'काही नाही. गायनाचे कार्यक्रम चालू असतातच. ठीक चालले आहे.' मी म्हणालो.

'तुम्हाला घेऊन मी एक संत-पट काढणार आहे. ज्याच्यावर अद्याप चित्रपट निघाला नाही, असा कुणी संत आहे का?' असे शांतारामबापूंनी विचारल्यावर 'पहातो, प्रयत्न करतो' असे मी आश्वासन दिले.

मी पुण्यास परतलो. सामान्य लोकातसुद्धा चित्रपट मान्यता पावेल, लोकमान्य होईल, असे कोणते संत चरित्र निवडावे यासंबंधीचा निर्णय मला चटकन् करता येईना. पण लवकरच मार्ग निघाला.

—कसबा पेठेत कासारदेवीच्या देवळासमोर एक मोठे पटांगण पूर्वी होते. तिथे सावतामाळी पुण्यतिथीनिमित्त श्री. दास गणू यांचे प्रवचन होते. त्या प्रवचनाला मी गेलो होतो. मला पाहाताच महाराजांनी मला एक अभंग म्हणावयास सांगितला. मी एक अभंग म्हटल्यावर महाराजांनी 'संत सावतामाळी' हे संत चरित्र मला भेटीदाखल दिले. ही भेट एक प्रसाद मानून ती मी शिरोधार्थ मानली. या पुस्तकाच्या पहिल्याच पानावर पुढील चरण होता—नामाचिया बळे ! न भिवू सर्वथा.

कळी काळाच्या माथा । सोटे मारू ।

माझ्या मनात कल्पना सुचली. मी ते पुस्तक शांतारामबापूंना दाखवले. 'फार मोठ्या माणसाच्या हातून ही भेट मिळाली आहे. या चरित्राच्या आधारे चित्रपट काढला तर चालेलही. पंढरपूरला कधी ही न गेलेला हा संत आहे. 'इथेच माझे पंढरपूर । कांदा मुळा भाजी ।' असे त्याने अभंगात म्हटले आहे.' मी म्हणालो.

शांतारामबापूंना ते पटले. चरित्रही चित्रपटास योग्य होते. 'मास्तर, यात तुम्हीच सावता माळ्याची भूमिका करायची.' मी त्यास कबूल झालो.

हिंदी ( माली ) आणि मराठी ( भक्तीचा मळा ) अशा दोन भाषांत हे चित्र काढण्याचे ठरले. चित्रीकरणास प्रारंभ करण्यापूर्वी मी अरणगाव येथे मुद्दाम गेलो. तेथे संत सावता माळी महाराजांच्या समाधीचे दर्शन घेतले. 'आपली सेवा करतो आहे, निभावून न्या' अशी मनोमन प्रार्थना केली.

प्रमुख भूमिकेबरोबरच संगीत दिग्दर्शनाचीही माझ्यावर जबाबदारी होती.

चित्रीकरण पाहाण्यास एकदा मी माझ्या पत्नीला बोलाविले. सावताच्या भूमिकेतला मी विहीर खणतो आहे असा प्रसंग होता. त्यासाठी माझ्या हातात एक भली मोठी लोखंडी पहारही देण्यात आली होती.

" तंबोरा हाती घ्यायची तुम्हाला सवय. पहार झेपणार नाही. आपण लाकडी पहार करून तिला रंग देऊ तीच तुम्ही वापरा " असा शांतारामबापूंचा आग्रह होता.

पण मी त्यास नकार दिला. ' पहारच द्या, त्यामुळे प्रसंग वास्तववादी होईल ' असे, मी सांगितले. बापू माझ्या बायकोला म्हणाले, " पहा, तुमचे यजमान बेलदाराचे काम करीत आहेत."

" हा प्रसंग बघायला फार त्रासदायक आहे, पुन्हा कधी चांगला ' सीन ' असेल तर मी येईन " असे माझ्या पत्नीने सांगितले व ती निघून गेली. पहारीमुळे हाताला घट्टे पडले. थोडे लागले पण मी पहार सोडली नाही.

शेतावर जाऊन काम करण्याचा आयुष्यात कधीच प्रसंग आला नाही. या भूमिकेमुळे एवढेच करावे लागत होते असे नव्हे तर नांगर धरावा लागे. मोट हाकावी लागे. मी ते सर्व हळूहळू शकलो. ' आमुची माळियाची जात। शेत लावू बागाईत' हे सावताचे वचन होते. मी घाम गाळत या वचनाची पूर्ती करीत होतो.

मनाशी म्हटले, गवई होण्यापेक्षा शेतकरी होणे फारच अवघड आहे!

चित्रपट पुरा होत आला– पत्नीला तर चांगला ' सीन ' पाहायचा होता. म्हणून शांतारामबापूंनी अखेरच्या चित्रीकरणास तिला मुद्दाम बोलाविले. सावताच्या मळ्याचा देखावा स्टुडिओत हुबेहूब उभारला होता. जिकडे तिकडे फुले–फळे यांनी मळे बहरले होते !

' राजा पंढरीचा, हरि माझा आला
मळा भक्तिचा फुलला । '

या भैरवीला चित्ररूपाचा साज शांतारामबापूंनी अशा काही बहारीने दिला की सारी मंडळी खूष झाली.

चित्रपटातील माझी प्रमुख भूमिका आणि संगीत या दोन्ही कसोट्यांना मी उतरलो. ' भक्तीचा मळा ' चित्रपट सर्वत्र गाजला. खेड्यातून बैलगाड्या भरभरून लोक चित्रपट पाहण्यास येत.

' विश्वाचे हे अमुचे वैभव गाजे ' हे स. अ. शुक्लांचे पद खूपच गाजले. सावता माळ्याचे मी म्हटलेले अनेक अभंग लोकांच्या कानावर प्रथमच गेले. विशेषतः ' कांदा मुळा भाजी अवघी विठाई माझी ' हा अभंग तर खूपच लोकप्रिय झाला.

' भक्तीचा मळा ' या एकाच चित्रापुरता मी राजकमलमध्ये राहिलो.

१९४४–४५ च्या सुमारास कोल्हापूरच्या विकास पिक्चर्स कंपनी-तर्फे ‘ मेरी अमानत ’ हा चित्रपट निघाला, त्याला मीच संगीत दिले. या चित्रपटात शाळामास्तर श्रीधरपंतांची प्रमुख भूमिकाही मी केली.

माणिक स्टुडिओजचा ‘ कीचकवध ’ आणि ‘ विठू माझा लेकुरवाळा या दोन चित्रपटांचे संगीत दिग्दर्शन केल्यावर १९४६ मध्ये चित्रपट व्यवसायाशी माझा खऱ्या अर्थाने संबंध तुटला. ‘ माणिक ’च्या ‘ कीचक-वध ’ प्रसंगी लता मंगेशकर या पार्श्वगायिका होत्या. ‘ धुंद मधुमति रात रे ’ आणि ‘ स्वयंवराची तिच्या घोषणा द्रुपदाने केली ’ ही त्यांची गाणी आजही रेडिओवर लागतात.

* * *

१९३४ ते ४६ हे एक तप चित्रपटसृष्टीत मी काढले. आणि १९४६ ते ५३ या काळात मी पुन्हा नाट्यसृष्टीत परतलो. अर्थात वयो-मानानुसार पूर्वीच्याच तडफेने, गतीने काम करणे शक्य नव्हते. मला खरे विचारले तर मी सांगेन सिनेसृष्टीपेक्षा मला नाट्यसृष्टीच अधिक प्रिय आहे. मी जेव्हा चित्रपटसृष्टीत गेलो तेव्हा रंगभूमी मरगळीस आली होती. पुन्हा परतलो तेव्हा रंगभूमी सजीव होऊ लागली होती. सिनेमातील नकलीपणापेक्षा नाटकातील सजीवता लोकांना आवडू लागली होती. ‘ नाट्यनिकेतन ’ या संस्थेला त्याचे फार मोठे श्रेय आहे. रंगभूमीचे पुनरुज्जीवन करण्याचे कार्य या संस्थेने केले. ‘ कुलवधू ’, ‘ कोणे एके काळी ’, ‘ एक होता म्हातारा ’, ‘ भाग्योदय ’ किंवा ‘ धुळीचे कण ’ वगैरे नाटकातील पदांना चाली देण्याचे काम मी केले. कुलवधूतील गाण्यांनी महाराष्ट्र अक्षरशः हेलावला. भाग्यवति मी....कुबेरा माझा धनी ’ हे गाणे तर खूपच गाजले. नाट्यसंगीताच्या चालीत कालमानाप्रमाणे कसा बदल होत गेला. हेसुद्धा ‘ नाट्यनिकेतन ’च्या नाटकांना मी दिलेल्या चालीवरून पाहता येईल, जुन्या नाटकातील पदांनाही मी चाली लावल्या. ती मी म्हटली. परंतु १९५० नंतरही मी या स्पर्धेत राहिलो. एवढेच नव्हे तर कालमानानुसार वाटचाल केली. जुने नाट्यसंगीत ( १९४० च्या अगोदरचे )– व नवे नाट्यसंगीत ( १९५० चे ) यांची जर तुलना आपण केलीत तर मी काय म्हणतो, हे सहज कळेल.

मी एक कलावंत आहे. राजकारणाशी माझा काहीच संबंध नव्हता. आणि नाही. तथापि अनेक राजकारणी लोकांशी माझा या ना त्या कारणाने संबंध जुळत गेला. हे संबंध अधिक घनिष्ट झाले ते माझ्या ‘ वंदेमातरम् ’ चळवळीने ! स्वातंत्र्योत्तर भारताचे राष्ट्रगीत ‘ वंदेमातरम् ’

हेच व्हावे म्हणून मी सातत्याने प्रयत्न केले, झगडलो. प्रयत्नांची पराकाष्ठा केली.

'वंदेमातरम्' गीताच्या मागे ज्वलंत राष्ट्रभक्ती, त्याग, अन्याया-विरुद्ध झगडा, लाठीमार, गोळीबार यांचा इतिहास आहे. ब्रिटिश अमदानीत तर 'वंदेमातरम्' एवढा शब्द उच्चारणे हा राजद्रोह होता. साहजिकच 'वंदेमातरम्' म्हणजे राष्ट्रगीत हे समीकरण आपोआपच निर्माण झाले होते. आपले हे राष्ट्रगीत आबालवृद्धांना सहजतेने म्हणता यावे म्हणून त्याला मी एक साधी सोपी पण कंठगत लवकर होईल अशी चाल दिली. एका सुरात ते म्हणता यावे ही या मागची भावना.

स्वातंत्र्यपूर्व काळातली ही माझी भावना. रात्री दोन वाजेपर्यंत जागून मी वंदेमातरम्‌ला चाल लावली. सकाळी उठताच मी प्रभातमध्ये गेलो व शांतारामबापूंना ऐकवली. ते म्हणाले 'ध्वनिमुद्रण करा.' हे ध्वनिमुद्रण झाल्यावर काही प्रमुख नागरिकांना बोलावून ते ऐकविण्यात आले. तत्पूर्वी दे. भ. काकासाहेब गाडगीळ, केशवराव जेधे, अच्युतराव पटवर्धन यांनाही मी वंदेमातरम् ऐकवले. चालीवर सर्व मंडळी खूष होती. कै. बाळासाहेब खेरांनीही तिची प्रशंसा केली. ही थोडीशी पार्श्वभूमी.

प्रभात, राजकमलमधून सुटल्यावर मी गायनाचे कार्यक्रम करू लागलो. रेडिओवरही माझे कार्यक्रम होत असत. 'सारे जहाँसे अच्छा' हे गीत मधून मधून वाजवले जात असे. त्यावेळचे मुंबई केंद्राचे संचालक श्री. बुखारी यांना मी म्हणालो की रेडिओवरून 'वंदेमातरम्' जनतेला ऐकविण्याची माझी इच्छा आहे. पण ही इच्छा नाकारण्यात आली. मी कै. तात्यासाहेब केळकरांना भेटलो. त्यांनी एक पत्र लिहिले की, 'पुढल्या पिढीला हे राष्ट्रगीत ऐकवण्याची मास्तरांची इच्छा आहे. आपण परवानगी नाकारू नका.' या पत्रानेही दाद लागेना. एकदा खुद्द बुखारी व दिनकरराव अमेम्बल पुण्यास माझ्या घरी आले. ती संधी साधून मी त्यांना 'वंदेमातरम्' ऐकविले.'

ते म्हणाले, 'आपण या भानगडीत पडू नका. आपले गाणे रेडिओवर व्हायला पाहिजे त्यासाठी आम्ही मुद्दाम आलो आहो.'

मी म्हणालो, 'निदान वंदेमातरमचे ट्यून्स तरी ऐकवू द्यात.' पण तेही जमले नाही. मी हट्टासच पेटलो होतो. मुंबई रेडिओवर मी एक धाडसी प्रयत्न करण्याचे ठरविले. साथीला हरिभाऊ देशपांडे होते. मी काय करणार आहे याची त्यांना अगोदर थोडीशी कल्पना दिली. 'वंदेमातरम्' ज्या स्वरात आहे, त्याच स्वररचनेत मी अगोदर एक गाणे म्हणण्याचे ठरविले. नंतर स्वर बदलावयास नको, हा हेतू होता. म्हणून

,सजला नटला जणू राजा ' हे पद म्हटले. ते पूर्ण होताच लगेच 'वंदेमातरम्' म्हणण्यास मी सुरुवात केली.

समोर बुखारी बसलेच होते. त्यांच्या चटकन लक्षात आले. ' वंदे मातरम् ' हे सहा शब्द जेमतेम होत आहेत तोच त्यांनी स्विच् बंद केला. आणि रेडिओवर संपूर्ण वंदेमातरम् म्हणण्याचा माझा प्रयत्न अयशस्वी झाला. माझा अपमान झाला म्हणून ' त्रिकाळ'कर्ते शि. ल. करंदीकर यांनी एक खणखणीत लेखही लिहिला. या प्रकरणाचे पडसाद ' कौन्सिल ' बैठकीतही उमटले.

मग मीही माझा निर्धार जाहीर केला. ' वंदेमातरम् म्हणू दिले तरच मी रेडिओवर गाईन, अन्यथा गाणार नाही. ही हकीकत श्री. दादासाहेब मावळंकर यांना माहिती होती. त्यांनी ती सरदार पटेलांच्या कानावर घातली. सरदारजींनी या प्रकरणी तात्काळ लक्ष घातले असावे. कारण जत संस्थानात मी गेलो तेव्हा तिथेच माझ्या नावावर एक पत्र आले. जतचे महाराज म्हणाले, ' मास्तर, पेढे काढा.'

' कशासाठी ? ' मी म्हणालो. मग त्यांनी सविस्तर पत्र वाचून दाखविले. ' आपण ' वंदेमातरम् ' म्हणून कार्यक्रमास सुरुवात करावी, असे पत्रात लिहिले होते. हे पत्र आले त्या दिवशी पाडवा होता. माझा आनंद गगनात मावेना.

आणि मुंबई केंद्रावरून प्रथमच ' वंदेमातरम् ' म्हटले. व नंतर गायनास सुरुवात केली. श्री. बुखारी म्हणाले, ' मास्तरसाहेब जीत तुमची झाली.

मी म्हणालो, ' नाही. जीत सर्व जनतेची आहे.'

' वंदेमातरम् ' म्हणू दिल्याशिवाय रेडिओवर कार्यक्रम करायचा नाही, ' हा माझा निश्चय मी चार ते पाच वर्षे पाळला. या अवधीत मी रेडिओवर गायलो नाही.

नंतरच्या काळात ' वंदेमातरम् 'चा मी खूप प्रचार आणि प्रसार केला.

भारत स्वतंत्र झाल्यानंतर काही वर्षांनी देशाचे राष्ट्रगीत कोणते असावे असा प्रश्न उपस्थित झाला. ' जन गण मन ' आणि ' वंदे मातरम्' यांपैकी एका गीताची राष्ट्रगीतासाठी निवड व्हायची होती. चर्चा ऐन बहरास आली होती तेव्हा मी सावद्याला ( फैजपूर ) होतो. तेथील बॅ. बाळासाहेब देशमुख हे माझे स्नेही. ' राष्ट्रगीत कोणते असावे याबातत दिल्ली येथे चर्चा चालू आहे ' अशा आशयाची ' टाइम्स ऑफ इंडिया 'त प्रसिद्ध झालेली बातमी त्यांनी माझ्या नजरेस आणली. मी लगेच पंडित

नेहरूंना सावधाहून तार केली ' मी एक गवई व संगीतकार असून या प्रश्नावर आपण माझे म्हणणे ऐकावे, अशी माझी इच्छा आहे. ' तारेला पंडितजींकडून लगेच उत्तर आले. ' मला दिल्लीत पुढच्या रविवारी भेटावे.'

त्याच रात्री मी सावधाहून दिल्लीस प्रयाण केले. ' मी येत आहे ' असे कै. काकासाहेब गाडगीळांना कळविले. त्यांनी मला नेण्यासाठी गाडी पाठविली. दिल्लीत गेल्यावर मी बाबू राजेंद्रप्रसाद यांच्या घरी जाऊन त्यांना ' वंदेमातरम् 'ची माझी चाल ऐकविली. ती ऐकल्यावर त्यांनी मला भजन म्हणण्याचा आग्रह केला. तो कसा मोडणार? मी भजन म्हटले ते त्यांनी टेपरेकॉर्डवर मुद्रित करून घेतले. नंतर दुसऱ्या दिवशी मी पार्लमेंट हाऊसवर पंडितजींना भेटण्यास गेलो. त्यांचे चिटणीस श्री. मथाई यांनी मला तेथील एका साध्या स्टुलावर बसवले. ' नहरू कामात गुंतले आहेत ' एवढेच ते म्हणाले. मी बराच वेळ ताटकळत बसलो. योगायोगाने श्री. स. का. पाटील तेथून जात होते. त्यांनी मला ओझरते पाहिले. नमस्कार वगैरे झाले. ' आलात केव्हा?' त्यांनी प्रश्न केला. मी तार दाखविली.

' नेहरूंची अद्याप मुलाखत झाली नाही, इथे बसवून ठेवले आहे!' असे मी सांगताच श्री. पाटील मथाईना म्हणाले, ' हे भारताचे सर्वश्रेष्ठ गायक आहेत. तुम्हाला माहिती नाही? त्यांना पंडितजींची तार आली. त्यांनी बोलाविले म्हणून ते इथे आलेले आहेत. '

ही मात्रा ताबडतोब लागू पडली. मी आल्याचे त्यांनी चेंबरमध्ये कळविले. लगेच पंडितजींनी चिठ्ठीवर कळविले ' रात्री माझ्या निवास स्थानी या. '

काकासाहेब गाडगीळांच्या गाडीतून मी पंडितजींच्या घरी गेलो. गाडी थांबली. पोर्चमध्ये ती येते न येते तोच पंडितजी बाहेर आले. व म्हणाले, ' आईये, आईये मास्टरजी आईये!'

त्यांनी मला आत नेले. आतल्या प्रशस्त खोलीत शेख अब्दुल्ला व बक्षी गुलाम महंमद बसलेले होते. मी येण्यापूर्वी त्यांचे पंडितजींशी बोलणे चालले होते. ' यांना माझ्याशी काही बोलावयाचे आहे, आपण वर जा ' असे पंडितजींनी त्या दोघांना सांगितले.

एका कोचावर आम्ही दोघेही बसलो. मी सर्व हकीकत सांगितली. ' वंदेमातरम् 'चे महत्त्व व अन्य माहिती सांगून मुद्दा जास्तीत जास्त पटवून सांगितला.

पंडितजींनी शंका काढली. ते म्हणाले ' हे गीत बँडवर बसविता येईल का?'

'मी तो प्रयत्न करून पाहिला नाही. पण आपण बँडची सोय केली तर मी ' वंदेमातरम् ' बँडवर बसवून दाखवितो.' असे मी उत्तर दिले.

' इथे ' टॅटू 'ची गडबड चालू आहे. बँड मिळणे कठीण आहे. मुंबईत सोय होणार नाही का ? ' असे त्यांनी पुन्हा विचारले. मी ' बघतो ' म्हणालो.

–मी मुंबईत लगेच परतलो. नायगाव पोलीस स्टेशनचे श्री. गार्डनर यांना बँडसाठी भेटलो. पण ते गडबडीत होते म्हणन पोलिस कमिशनर श्री. भरूचा यांना भेटलो व बँडवर ' वंदेमातरम् ' बसविण्यासाठी श्री. गार्डनर यांना थोडी फुरसत द्या, अशी त्यांना विनंती केली. व ती त्यांनी मान्य केली. मग मी व गार्डनर या दोघांनी नेटाने प्रयत्न सुरू केले. पोलिस परेड पाहिली. संचलनाच्या वेळी पावले किती अंतराने पडतात, एका मिनिटात किती पावले पडतात, हे सर्व पाहून ' वंदेमातरम् ' बँडवर बसविले. मग एच्. एम्. व्ही. मध्ये गेलो. व बँडचे रेकॉर्डिंग करून परत दिल्लीस गेलो.

' वंदेमातरम् ' हेच राष्ट्रगीत व्हावे म्हणून मी एच्. व्ही. कामथ, महावीर त्यागी, सत्यनारायण सिन्हा वगैरे अनेक लोकांना भेटलो. श्री. सिन्हा त्यावेळी काँग्रेस पक्षाचे ' प्रतोद ' होते. "माझी चाल सर्व सभासदांनी ऐकावी, अशी इच्छा मी त्यांच्याजवळ व्यक्त केली. ती त्यांनी तात्काळ मान्य केली. नंतर लगेच मला कळविण्यात आले की, अमुक दिवशी सायंकाळी पाच वाजता मी रेकॉर्डिंगसहित पार्लमेंटमध्ये यावे व ' वंदेमातरम् 'चे प्रात्यक्षिक करून दाखवावे."

माझी जागा वगैरे ठरवून देण्यात आली. ' वंदेमातरम् ' राष्ट्रगीत का व्हावे, यासंबंधीची भूमिका विशद करणारे माझे भाषण मी छापून घेतले होते, त्याच्या प्रती सभासदांना दिल्या. रेकॉर्डिंग ऐकण्यापूर्वी मी ते भाषण वाचून दाखविणार होतो. पण ऐनवेळी ते मी बाजूला केले. आणि उत्स्फूर्तपणे हिंदीत बोललो. तेव्हा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. मी 'जनगणमन' व ' वंदेमातरम् ' या दोहोंत तुलना केली. वंदेमातरम् स्लो मार्च, क्विक मार्च, वगैरे प्रसंगी बँडवरही कसे म्हणून दाखवता येईल याची प्रात्यक्षिके करून दाखविली.

— वंदेमातरम्'साठी एवढे प्रयत्न, प्रयास केले. परंतु अखेरीस ' जनगणमन ' हेच राष्ट्रगीत व्हावे, असे ठरले !

मी ' वंदेमातरम् ' ची ध्वनिमुद्रिका काढली. आज ती अनेक शाळा-कॉलेजात समारंभप्रसंगी वाजविली जाते.

× × ×

॥ १ ॥

## चीनची सांस्कृतिक सफर

पॅन अॅमेरिकाच्या पायोनियर फिल्म्थ या अजस्त्र व भीमकाय विमानाने एक भले मोठे उड्डाण घेतले व आम्ही दिल्लीचा पालम विमानतळ सोडला. चीनला जाण्यासाठी भारतीय सांस्कृतिक शिष्टमंडळ निघाले होते व त्यात माझा समावेश झाला होता.

माझ्यासारखा रंगभूमीवरचा एक कलाकार, गायक परदेशाच्या दौऱ्यावर—आणि त्यातूनही चीनच्या दौऱ्यावर जातो, हीच माझ्या दृष्टीने अपूर्व नवलाची आणि अकल्पित योगायोगाची गोष्ट होती. हे घडले कसे? याचाच मी विमानात विचार करीत होतो....

ऑल इंडिया पीस कमिटीने एक सांस्कृतिक शिष्टमंडळ चीनला पाठविण्याचे ठरविले. या शिष्टमंडळात गायक, वादक व नर्तक यांचा समावेश होता. विविध प्रांतातील एकूण २९ कलाकार शिष्टमंडळात होते. मी, सौ. हिराबाई बडोदेकर, सौ. ज्योत्स्नाबाई भोळे, असे तिघे गायक. सारंगीवादक श्री. गोळवलकर, तबलजी महादेव नारायण इंदूरकर, सतारिये विलायतखां आणि नृत्यकार कु. दमयंती जोशी असे अन्य कलाकार मिळून आमचा सात जणांचा संच होता.

चीनला जाण्यापूर्वी म्हणजे १० जुलै १९५२ रोजी आम्ही दिल्लीला पोहोचलो. टाऊन हॉलमध्ये शांतता कमिटीचे अध्यक्ष

डॉ. किचलू, काही सभासद आणि चिनी वकिलातीमधील अन्य अधिकारी मंडळींशी आमचा परिचय करून देण्यात आला. त्याच दिवशी स्टेडियम सिनेमागृहात कलावंतांचे विविध कार्यक्रम झाले. त्या दिवशी मी विश्रांती घेतली. पण दुसऱ्या दिवशीच्या कार्यक्रमात एक राग व ठुमरी म्हणालो.

कार्यक्रमाच्या दिवशी चिनी वकिलातीने सायंकाळी एक थाटाची मेजवानी दिली. तिला अनेक मंडळी आली होती. चीनमध्ये कोणत्या प्रकारचे भोजन मिळेल, याची ती रंगीत तालीमच होती. पण ११ जुलैला आम्ही निघण्याच्या तयारीत असतानाच बसऱ्याजवळ विमानात बिघाड झाल्याने आम्हाला दोन दिवस दिल्लीतच मुक्काम करावा लागला.

पॅन-ॲमच्या विमानाने आमचा १४ जुलैच्या सायंकाळी प्रवास सुरू झाला. विमान खूपच प्रशस्त होते. जेवणाची सोयही उत्तम होती. काही प्रवाशांना विमान ' लागत ' होते. मला मात्र अजिबात त्रास झाला नाही. भूक मात्र सपाटून लागायची. दिल्ली कलकत्ता, बँकॉक व हाँगकाँग असा प्रवास होता. प्रत्येक ठिकाणी विमान पाऊण तास थांबे; अशा वेळी पाय मोकळे करण्यासाठी आम्ही उतरत असू.

मी संपूर्णपणे शाकाहारी. चहा कॉफीसुद्धा न घेणारा. विमान तळावर रिकामा वेळ कसा घालवायचा ? माझ्या पत्नीने स्वादिष्ट सुपारी कुटून दिली होती. त्याशिवाय पानाची चंची होती. पत्नीने मुगदळाचे लाडू, लोणचे, लसणीची खमंग चटणी दिली होती. सुमारे महिनाभर पुरेल असा गच्च डबा माझ्याबरोबर होता. माझे मुंबईचे स्नेही श्रीमंत मथुर शेटजी यांनी खास मघई पानांची एक करंडी बांधून दिली होती. माझी अजिबात गैरसोय होऊ नये म्हणून मित्रांनी, कुटुंबियांनी फारच काळजी घेतली होती. बँकॉक ते हाँगकाँग हा पहाटेचा प्रवास फारच उत्तम झाला. निळ्याशार ढगातून आमचे विमान जेव्हा जाई तेव्हा फारच मजा वाटे. पाण्याखालून पोहत जाणाऱ्या माशाप्रमाणे ते दिसे. सकाळी सव्वा-दहा वाजता आम्ही हाँगकाँगला पोहोचलो. पासपोर्ट, सामान तपासणी उरकून आम्ही हॉटेलवर आलो. या पाच मजली हॉटेलात माझी १०७ नंबरची खोली होती. चिनी लोकांच्या दर्शनास येथूनच सुरुवात झाली. हाँगकाँग शहरात पंजाबी, सिंधी व काही शीख व्यापारी फारच मोठ्या प्रमाणावर आढळले. महाराष्ट्रीयांचा अभाव मात्र प्रकर्षाने जाणवला. हाँगकाँगहून या पुढचा प्रवास रेलगाडीने व्हावयाचा होता. सकाळी अकरा वाजता आम्ही गाडीत बसलो. फलाटावर उभ्या असलेल्या मुलाकडून चिनी वृत्तपत्र घेतले. पहिल्या पानावर आमचा फोटो होता. तो पाहूनच समाधान मानले. कारण मजकूर वाचणे कठीण !

हाँगकाँग-हद्दीतील शेवटचे स्टेशन चौलान. इथे ब्रिटिश हद्द संपते व चिनी सरहद्द सुरू होते. आम्ही थोडे अंतर पायी चालून गेलो. एका नदीच्या पुलावर उभे राहिलो. सामान तपासणी, कागदपत्रांची पाहाणी यात फार वेळ गेला नाही. इकडे ब्रिटिश हद्द, पलीकडे चीनची हद्द व मध्यभागी आमचे सांस्कृतिक मंडळ, असा थाट होता ! चीनच्या हद्दीवर दोन बंदुकधारी सार्जंट उभे होते. त्यांचा चेहरा निर्विकार होता. आपण बरे की आपले काम बरे; बंदूक खांद्यावर टाकून त्यांचा खडा पाहरा चालू होता. शिष्टमंडळातील बहुरंगी मंडळी पाहून त्यांच्या चेहऱ्यावर काडीचाही परिणाम झाला नाही. चिनी हद्दीत प्रवेश करताच टाळ्यांच्या प्रचंड गजरात आमचे स्वागत झाले. सुमारे दोनेक फर्लांग अंतर चालून गेल्यावर 'संनूचन्' च्या फलाटावर आलो. थोडीशी विश्रांती, चहा-कॉफी इत्यादी घेऊन मंडळी तेथेच उभ्या असलेल्या खास गाडीत बसली. वाटेत कोणत्याही स्थानकावर न थांबता गाडी थेट कॅंटनूलाच पोचणार होती. खास गाडीतील व्यवस्थाही चांगली होती. चार माणसेच बसू शकतील असे आरामशीर कंपार्टमेंटस, आत विजेचे पंखे, तोंड धुण्याचे पॉट होते. टेबलावरील डिशेसमध्ये लेमन ड्रॉप्स, चॉकलेट्स होती. एक तस्त, पायात घालायच्या सपाता, मखमली गाद्या, गरम ब्लॅंकेटस, उशा एवढा गाडीत थाटमाट होता.

संध्याकाळी सहा-साडेसहा वाजण्याच्या सुमारास आमची गाडी कॅंटन स्थानकावर आली. स्वागतास खूपच लोक आले होते. सांस्कृतिक शिष्टमंडळाचे नेते श्री. सचीसेन दासगुप्ता हे सर्वप्रथम गाडीतून उतरले. पीस कमिटीचे चेअरमन, मुली शिस्तीत रांगेत उभ्या होत्या. मुलींनी प्रत्येकास गुच्छ दिला व हसतमुखाने स्वागत केले.

कॅंटनला येथील स्थानिक कलावंतांनी एक सांस्कृतिक कार्यक्रम केला. त्यापैकी 'कोरस' गाणे आम्हाला खूपच आवडले. परंतु एका बाईने जे लोकगीत म्हटले ते मात्र बिलकुल आवडले नाही. कारण बाईचा आवाज 'पिंजरा' होता. आम्हाला पेकिंगला जायचे असल्याने आमचा कार्यक्रम करणे शक्य नव्हते.

पेकिंग येथील कार्यक्रमप्रसंगी कोणकोणती गाणी म्हणायची, नृत्ये कोणती सादर करावयाची यासंबंधी रुपरेषा ठरवण्यासाठी आमची एक छोटीशी बैठक झाली. सर्वांना रुचतील, पचतील व आवडतील असेच कार्यक्रम चिनी जनतेसमोर सादर करण्याचे आम्ही ठरविले. ऐकण्यास कठीण न वाटता थोड्या वेळात रंगतील अशा रागांची मी योजना केली. भूप, दुर्गा, मालकंस, भैरवी हे राग, मीराबाईंची भजने व नाटकांतील गाणी अशी स्थूलमानाने रचना होती.

सकाळीच आम्ही कॅंटन शहराचा निरोप घेतला. खास गाडीने उंछान स्थानकावर दुपारच्या सुमारास पोचलो. तेथून स्टीम लॉन्चमध्ये बसून हॅंगचौ शहरात प्रवेश केला. एका हॉटेलातच आमच्या निवासाची सोय करण्यात आली होती. स्नान, जेवण करून थोडी विश्रांती घेतली. संध्याकाळी पुन्हा रेल्वेने प्रवास सुरू झाला. जुलै-ऑगष्ट हे पावसाचे महिने असूनही उष्मा कमालीचा जाणवत होता. सर्वत्र हिरवळ, भात, मका, कापूस यांची शेते. सुमारे अडीच दिवसांचा प्रवास संपवून आम्ही २० जुलैला रात्री साडेअकरा वाजता पेकिंगला पोहोचलो. याही ठिकाणी आमचे भव्य स्वागत झाले. रात्र बरीच झाली होती, म्हणून आम्ही तडक 'पीस' या आठ मजली हॉटेलात निवासासाठी गेलो. माझी खोली पाचव्या मजल्यावर होती व जोडीदार श्री. गोळवलकर लाभले होते. असे सांगण्यात आले की हे हॉटेल दोन हजार मजुरांच्या साहाय्याने अवघ्या तीन महिन्यांत बांधून पूर्ण केले. हॉटेलची रचना, बांधणी अत्यंत आकर्षक होती.

पेकिंगमधील आमचा पहिला कार्यक्रम २३ जुलैला झाला. सुरुवातीस सौ. हिराबाई, सौ. ज्योत्स्नाबाई, कु. दमयंती जोशी, मद्रासचे दासप्पा, मूर्ती, आसामचे शर्मा आणि मी स्वतः 'वंदेमातरम्' म्हटले. टाळ्यांच्या गजरात लोकांनी त्याचे स्वागत केले व पुन्हा अभिवादन करण्यास आणखी एकदा पडदा उघडावयास लागला.

मी भजन म्हणतेवेळी हातात चिपळ्या घेऊन ताल धरला. हा ठेक्याचा प्रकार पाहून चिनी जनतेला थोडी गंमत वाटली. सर्व कलावंतांना ठराविक वेळ दिला होता. त्या हिशेबाने प्रत्येकास सात-आठ मिनिटे मिळत. मलबारमधील कलावंतांचे वैशिष्ट्य असे होते, की न बोलता, कडकडीत वादनाने दुर्योधन, दुःशासन, नृसिंह, हिरण्यकश्यपूचे प्रवेश करून दाखवीत. कु. दमयंती जोशी, मद्रासची चंद्रलेखा यांच्याप्रमाणेच विलायत खॉं यांचा ही कार्यक्रम उत्तम होत असे. कार्यक्रम पाहाण्यासाठी थिएटर चिक्कार गर्दीने भरलेले अस. एक दुभाषी मुलगी प्रत्येक प्रोग्राम इंग्रजीत व नंतर चिनी भाषेत निवेदन करी. कलावंताचे नाव, तो काय म्हणणार, रागाचे नाव, त्याचे वर्णन इत्यादी गोष्टींचा या निवेदनात समावेश असे.

पेकिंगमधील आमचा दुसरा कार्यक्रम ॲसेंब्ली हॉलमध्ये झाला. त्याला चीनचे अध्यक्ष मावोत्से-तुंग, पंतप्रधान चाऊ-एन लाय, त्यांचे मंत्रीगण, भारतीय वकील श्री. राघवन् वगैरे प्रमुख मंडळी उपस्थित होती. हॉल खूपच भव्य, परंतु आकर्षक होता. हा कार्यक्रम झाल्यानंतर आम्हा सर्व कलावंतांच्या सन्मानार्थ एक थाटाची मेजवानी देण्यात आली.

पंतप्रधान चाऊ एन लाय यांनी शिष्टमंडळाचे आभार मानले. " शिष्टमंडळाचे आगमन ही एक शुभदायी घटना आहे, कारण आणखी बारा तासानी कोरियाच्या तहावर स्वाक्षऱ्या होणार आहेत. " असे त्यांनी जाहीर करताच टाळ्यांचा कडकडाट झाला. नंतर प्रत्येकाने ग्लासाला ग्लास लावून मद्य प्राशन करण्यास सुरुवात केली. मी मद्य घेत नसल्याने 'ऑरेंज' घेतले व तोच ग्लास अन्य लोकांच्या ग्लासास भिडविला. जेवणाचा थाट शाकाहारी व मांसाहारी होता. विविध प्रकारच्या भरपूर डिशेस होत्या. काय खावे व काय खाऊ नये याचा भ्रम पडावयाचा. पदार्थ चवदार होते. ते खूप खावेत असे वाटे. परंतु भाषणे बरीच असल्याने तिकडेही लक्ष द्यावे लागे. त्यामुळे जेवणाकडे दुर्लक्ष होई. भोजन समारंभप्रसंगी चिनी कलावंतांची गाणी झाली.

कार्यक्रम झाल्यानंतर दुसऱ्या दिवशी आम्ही ' इंपिरियल पॅलेस ' पाहाण्यास गेलो. या पॅलेसमधील कलाकुसरीचे, नक्षीचे काम पाहून तर मी अगदी थक्कच झालो. या हॉलमध्ये प्राचीन काळातले पुतळे, गायन–वाद्नाच्या जागा, स्नानाच्या जागा, खोदीव काम पाहिले व चकित झालो. फार प्राचीन काळच्या वस्तू या पॅलेसमध्ये जतन करून ठेवल्या होत्या. या पॅलेसचे आवार इतके मोठे होते की त्यात आग्र्याचा किल्ला सहज मावेल. बुद्धाची मंदिरे, बुद्धाच्या हसऱ्या मूर्ती व इतर काही मूर्ती आठशेपेक्षा जास्त वर्षांच्या आहेत. ' उन्हाळी राजवाडा ' सर्वात उंच असून त्याच्यापुढे एक विस्तीर्ण तलाव आहे. पॅलेसच्या शेवटी उंचावर बुद्धाची एक प्रचंड मूर्ती असून ती सर्वोत्कृष्ट होती. परंतु देवळात पूजाअर्चेचा थाट नसल्याने उदासीनता वाटे. पायात जोडे घालून देवळात जाणे मला आवडले नाही. पॅलेसमधील कलावंतांनी आम्हाला नृत्य, नाटक व ऑपेरा आणि काही कसरतीची कामे करून दाखविली.

पेकिंगच्या इंटर नॅशनल क्लबमध्ये चिनी संगीतकार व भारतीय संगीतकार यात संगीतावर चर्चा झाली. नृत्य आणि नाट्य यावरही विचारविनिमय झाला.

एक दिवस पेकिंगमध्ये विश्रांती घेतल्यानंतर आम्ही रात्रीच्या गाडीने क्वाटिंग स्टेशनला पोहोचलो व तेथून एका मोठ्या धरणाचे काम पाहाण्यास गेलो. हजारो मजूर तेथे राबत होते. धरणाच्या पाच सहा मैलांच्या परिसरात आम्ही जिथे जिथे गेलो, तिथे तिथे टाळ्या वाजवून आमचे स्वागत करण्यात आले. मजुरांचे मनोरंजन व्हावे म्हणून लाऊडस्पीकर्सवर ध्वनिमुद्रिका लावण्यात आल्या होत्या. ते पाहून गंमत वाटली. या ध्वनिमुद्रिकेत राष्ट्रगीते, लोकगीते व स्फूर्तिगीते यांचा समावेश होता.

आमची गाडी सुरू झाली. आणि चीनमधील ' सर्वांत प्रचंड अशा भिंतींचे ' दर्शन होऊ लागले. चीनचुंग्शान स्टेशनवर कलिंगडे खूप दिसली म्हणून त्यांचा आस्वाद घेतला.

चीनची प्रचंड भिंत पाहाण्यासाठी आम्ही थोडावेळ पायीच निघालो. पायवाट चालून गेल्यावर वर चढण्यास सुरुवात केली. दुरूनच ' ग्रेट–वॉल'चे भाग दिसत होते. आम्ही एका बुरजापर्यंत गेलो आणि दूर सर्वत्र पसरलेले डोंगर सर्पासारखी अजस्त्र पसरलेली भिंत पाहून आश्चर्यचकित झालो. १४५० मैल लांबीची ही भिंत कशी बांधली असेल ? सुमारे दोन हजार वर्षांपूर्वी बांधलेली ही भिंत अजूनही चांगल्या स्थितीत आहे.

पेकिंगला आमचे एकूण चार कार्यक्रम झाले. अखेरच्या कार्यक्रमाच्या वेळी प्रत्येकाचा गुच्छ देऊन सत्कार करण्यात आला. फोटोही घेण्यात आले. पेकिंगला परत येणे कसचे होणार ? आम्हीही सर्वांचा प्रेमाने निरोप घेतला. महाराष्ट्रीय मंडळींपैकी श्री. वसंतराव परांजपे, श्री. खडसे, श्री. सहस्त्रभोजने ही मंडळी भेटल्याने समाधान वाटले.

पेकिंगहून आम्ही टेन्‌सिन या शहरी आलो. आम्ही पेकिंगलाच ऐकले होते की, टेनसिनला एक उत्तम संगीतसंस्था आहे. या संस्थेचे नाव ' नॅशनल कॉँझरव्हेटिव्ह म्युझिक इन्स्टिटयूट. ' टेन्‌सिन शहरातील इस्पितळ, कागदाची गिरणी, विद्यापीठ या संस्थाना भेटी दिल्या. म्युझिक कॉलेजात प्राचार्य, विद्यार्थीवर्गाची गाठभेट व नंतर ओळख झाली. संस्थेतील एका हॉलमध्ये वाद्यांचे प्रदर्शन पाहिले. ही वाद्ये अतिशय सुंदररीतीने मांडून ठेवलेली होती.

या म्युझिक कॉलेजात चारशे विद्यार्थी शिक्षण घेत असून त्यांच्या राहाण्याजेवण्याचा व अन्य खर्च सरकारचा आहे. हस्तलिखित व छापलेले सुबक संगीत ' कोर्सेस ' पाहून मला खूपच आनंद झाला. पेकिंगपेक्षा टेन्‌सिनला आमचे कार्यक्रम जास्त प्रमाणात रंगले. याचे कारण ही म्युझिक संस्था. तीमुळे लोकांना संगीताविषयीची शास्त्रीय माहिती प्राप्त झालेली होती. त्यांची श्रवणशक्ती सुद्धा उत्तम होती. माझ्या पुस्तकातील ' भूप ' आणि ' दुर्गा ' या चीजा त्यांना प्रात्यक्षिकांवर समजावून दिल्या. राग-तालांची माहिती सांगितली.

टेन्‌सिनचा निरोप घेऊन आम्ही नानकिंगला आलो. वाटेत यॉँगत्से नदी पाहिली. केवढ्या अफाट पात्राची नदी ! ही नदी पार करावयाची म्हणून आमच्या खास गाडीचे दोन दोन डबे अलग करून बोटीवर घातले. आम्ही गाडीत बसूनच होतो. डबे बोटीवर चढले. आम्ही म्हणालो,

'आपली गाडी आता बोट घेऊन चालली बरं!' अशी मौज मी अद्याप कुठेच पाहिली नव्हती.

वेळ अगदी मजेत गेला. पैलतीराला पोचल्यावर पुन्हा डबे खाली उतरवून जोडले गेले, व थोड्याच वेळात आमची गाडी नानकिंगला पोचली. नानकिंगला उष्मा कमालीचा वाटला. प्रथम दर्शनी शहर बेताचेच वाटले. पण तो भ्रमच ठरला. वीस लाख वस्तीचे हे शहर खूपच मोठे आहे. बसेस खूप होत्या, पण ट्रॅम नव्हती. व्हिक्टोरियाही दिसल्या. ऐतिहासिक दृष्ट्याही नानकिंग शहराला खूपच महत्त्व आहे. चीनचे नेते डॉ. सत-यत्सेन यांची समाधी शहरापासून दहा मैलांवरील एका डोंगरावर आहे, ती पाहाण्यास गेलो. तीनशेच्यावर पायऱ्या चढून तिथे जावे लागते. समाधीच्या आसपासचे वातावरण, निसर्गरम्य केलेले आहे.

चँग–कै–शेक याने दोन दिवसात एक लाख लोकांना मारले ती जागा पाहाण्यास दुसऱ्या दिवशी गेलो. मारलेल्या लोकांचे स्मारक एका लहान डोंगरावर आहे. तेथील एका दुभाषाने आम्हाला या हत्याकांडाची माहिती सांगितली.

नानकिंगचे 'लोकल म्युझियम'ही पाहाण्याचा लाभ मिळाला.

या पुढचा मुक्काम शांघाय शहरात आम्ही केला. ६० लाख वस्तीच्या या शहरात आमचे कार्यक्रम झाले. चिनी कलावंतांनी विविध करमणुकीचे कार्यक्रम करून दाखविले.

चीनचे प्रसिद्ध नट मिलर फॉग यांचे नाव मी खाडिलकरांकडून अनेक वेळा ऐकले होते. ते पेकिंगला भेटतील असे वाटले. पण ते शांघायला गेले असे कळले. या मुक्कामात त्यांची भेट झाली तर बरे होईल, असे वाटले. योगायोगाने त्यांची भेट झाली. एवढेच नव्हे, तर त्यांनी आम्हाला त्यांच्या निवासस्थानी येण्याचे निमंत्रण दिले.

आपल्याकडे जसे बालगंधर्व तसे चीनमध्ये मिलर फॉग! साठ वर्षांचे वय असूनही वार्धक्याची छटा चेहऱ्यावर दिसत नव्हती. चीनमधील या नटसम्राटाने आपली शिष्यपरंपरा फार मोठ्या प्रमाणावर निर्माण केली आहे.

ठिकठिकाणी खूप कार्यक्रम झाले होते. अनेक स्थळांना भेटी दिल्या होत्या. थोडी विश्रांती हवी होती म्हणून आम्ही दोन दिवसांच्या वास्तव्यासाठी हौन-चौला आलो.

हौन-चौ हे शहर अतिशय रमणीय वाटले. उपवने, तळी, बगिचे जागोजागी होते. तळ्यात एकजात केशरी रंगाचे मासे शोभेसाठी सोडले

होते. एका रंगातील हजारो मासे लष्करातील सैनिकांप्रमाणे एका पाठोपाठ थव्याने येताना पाहाण्याची गंमत काही औरच होती. त्यांना पापडाचे तुकडे दिले की ते पटापट उड्या मारून खात. हौन-चौचा मुक्काम थोडा लांबला; त्या अवधीत काही खरेदी केली. नौकाविहार केला.

...चीनचा हा अभूतपूर्व दौरा उरकून आम्ही हाँगकाँग येथे एक दिवस विश्रांती घेतली आणि विमानमार्गे भारताकडे परतलो....

x x x

॥ १० ॥

## मास्तरांची गाणी

मैफिलीत प्रसन्नतेनं गायकीशी इमान ठेवणारा साक्षात्कारी गायक, रंगभूमीवर आपल्या प्रसन्न आवाजानं सहजपणे रंगत आणणारा नट, चित्रपटातील भावमधुर चालींनी तरुण वर्गाला नादब्रह्मात जखडून ठेवणारा संगीत दिग्दर्शक, आणि भक्तिगीतांनी व नाट्यगीतांनी रसिकांना वेड लावणारा गायक....... अशा अनेकविध 'भूमिका' मा. कृष्णरावांनी पार पाडून सुमारे पाच-सहा तपे मराठी मनावर अधिराज्य गाजविले.

मास्तरांच्या मैफिलींना संगीततज्ज्ञांपासून अनभिज्ञांपर्यंत सर्वच रसिक हजेरी लावून 'दाद' देत असत. याचे वर्णन करताना आचार्य अत्रे यांनी म्हटले होते की, एकीकडे पं. भास्करबुवा बखले यांच्या मैफिलीत चमकताना दुसरीकडे बालगंधर्वांसारख्या गायक नटाच्या नाटकात आपल्या पदांची स्वतंत्र छाप मास्तर कृष्णारावांनी ठेवली. चित्रपट संगीताकडे त्यांनी तुच्छतेच्या भावनेने कधीच पाहिले नाही. चित्रपटातील गीतांना चाली दिल्याने आपल्या गवयी प्रतिष्ठेला बाधा येते, असा खोटा अहंकारही मास्तरांनी बाळगला नाही. पण ते करताना त्यांनी आपले अभिजात संगीत भ्रष्टही केले नाही.

मास्तरांनी शाळकऱ्यांपासून माळकऱ्यांपर्यंत आपले गाणे पोहोचविले, असे श्री. पु. ल. देशपांडे यांनीच एका भाषणात सांगितले होते.

महाराष्ट्र टाइम्ससाठी आठवणींचे लेखन करीत असताना मी एकदा मास्तरांना सहज विचारलं होतं की, तुमच्या गायनाच्या जवळजवळ चाळीस-पन्नास ध्वनीमुद्रिका निघाल्या. त्या लोकप्रिय झाल्या. पण तुमची आवड तुम्ही सांगू शकाल का ?

मा. कृष्णराव म्हणाले, सुधाकर, एखाद्या माऊलीला विचारलं की, बाई, तुला तुझा कोणता मुलगा आवडतो ?— तर ती काय उत्तर देईल ? माझ्यासारख्या गायकाचीही तीच अवस्था आहे. सर्वच रेकॉर्ड्स् माझ्या आवडीच्या आहेत.

मास्तरांचे चिरंजीव श्री. राजाभाऊ माझ्या शेजारीच बसले होते. ते मंदपणे हसले. माझे कुतूहल, जिज्ञासा त्यांनी जाणली असावी. 'सगळी गाणी आठवून सांगणं शक्य नाही. पण काही निवडक गाणी सांगा ना !' असा श्री. राजाभाऊंनी आग्रह धरला.

अखेरीस मास्तर आपल्याच विचारात मग्न झाले. एकेक गाणं आठवून, मांडीवरच ठेका धरून त्यांनी काही निवडक, आवडणारी, गाणी गुणगुणून दाखवली. ती अशी : 'कृष्ण माझी माता' 'देव म्हणे नाम्या पाहे', 'तुझिये निढळी', 'अगा वैकुंठीच्या राया', 'परब्रह्म निष्काम', ही भक्तिपर गीते, 'ऐक ऐक सखये बाई' 'अवधी न भाग्य मला' 'चलो सखी चलो' 'श्याम मोहन प्यारे' अशी अन्य गाणी.

एकाच बैठकीत अशी यादी मागणं हे अप्रस्तुत होतं. मास्तरांनी यापूर्वी अनेकदा अमरज्योती, माणूस, शेजारी, गोपाळकृष्ण, भक्तीचा मळा, कीचक वध चित्रपटातील गाण्यांचा गौरवानं उल्लेख केला होता. महाराष्ट्रातील अनेक रसिकांना ही गाणी माहितही आहेत. खुद्द मास्तरांची कोणती व किती गीते आहेत, किती ध्वनीमुद्रिका आहेत, याबाबत मी तर अनभिज्ञ होतो.

माझे चित्रकार मित्र श्री. मुकुंद तळवलकर हे शास्त्रीय संगीताचे विशेष प्रेमी. नामवंत गायकांच्या मैफिली, गाणी त्यांनी टेपरेकॉर्डवर मुद्रित केली आहेत. त्यांच्याशी बोलताना मास्तरांचा विषय अनेक वेळा निघे. आठ-नऊ वर्षांपूर्वी त्यांनी बोलण्याच्या ओघात मास्तरांच्या ध्वनिमुद्रिकांचा उल्लेख केला. त्यातील अनेक ध्वनिमुद्रिका निदान मला तरी अपरिचित होत्या. या काही ध्वनिमुद्रिकांच्या ओळी अशा : 'अनाथन के नाथ', 'कैसी बनू', 'होरी अनोखे' 'मुंदरी मोरी' 'नंद नंदना' 'माधव मुकुंद हे सखया' 'काहे अब तुम' 'बाजे झनन' 'सबको अपना' 'फूली बन टेसू' 'श्याम मोहन प्यारे' 'मोपे डर गयो' 'विदुर घर जावे', 'नदियाँ म्हारे बोल', 'कान्हा मुरलीया बाजे', 'मानो पूजा यह मेरी', 'चलो

सखी ', ' अमर है हिन्दुस्तान ', ' ठुमके पग पायल ', इत्यादी.

नाटकातील पदांच्या काही ध्वनिमुद्रिका : ' छळिती या हृदया ' ' मानभंग दाही ' ' ललना मना ' ( एकच प्याला ), ' सुरसुखखनि तू विमला ' ' तेजा नभी ' ' लोळत कच ', ' भास मळा जाहला ', ' धनगर वर हितची ', ( विद्याहरण ), ' गमली मना ', ' तळमळिला ' ' पुरुषास स्त्री ', ' नमनी प्रीती ही नाही ',' विलसित न रणभूमीत ' ( द्रौपदी ), ' ताराया दिन अबला ', ' पतित पावना ', ' पति ठेवता, गुरु ' देवता ', ( विधिलिखित ) ' भाग्यवती भुवनात ' ' कुसुमविधी चारूकान्त ' ' तारावया जन ' ' अवधी न भाग्य मला ' ( नंदकुमार ), ' लपविला लाल ', ' नच कधी रस सेवाया ' ( स्वयंवर), ' मिळवूनी त्रिभुवनीच्या ' ' जी पुण्ये संपादिली ' ( शापसंभ्रम ).

' भक्तीचा मळा ' या चित्रपटातील ' कांदा मुळा भाजी, अवघी विठाबाई माझी ' आमुची माळियाची जात ' ' राजा पंढरीचा ' ' विश्वाचे हे असुचे ' ' नामाचिया बळे ' ' सोड सोड कान्हा ' ही गाणी मास्तरांनीच म्हटली. याच चित्रपटाची हिंदी आवृत्ती ( ' माली ' ) काढली होती. त्यातही सावता माळीची भूमिका व गाणी मास्तरांनी गायली होती. ' मेरी अमानत ' चित्रात भूमिका व संगीत मास्तरांचेच होते.

## संगीत कलानिधीचा जीवनपट

* मा. कृष्णराव फुलंब्रीकर यांचा जन्म २० जानेवारी १८९८ चा.
* सवाई गंधर्व ऊर्फ रामभाऊ कुंदगोळकर, उस्ताद निसार हुसेन खाँ या दोन महान गायकांचा सहवास व काही अशी प्रारंभिक शिक्षण मा. कृष्णरावांना ऐन बालपणातच मिळाले.
* वयाच्या बाराव्या वर्षी नाट्यकला प्रवर्तक मंडळीला ' रामराम ' ठोकून १९१० साली पुण्यास प्रयाण.
* त्याचवर्षी गायनाचार्य भास्करबुवा बखले यांचे शिष्यत्व पत्करले. त्यांच्याकडे सुमारे दहा-बारा वर्षे मा. कृष्णरावांनी गायनाची कसून तयारी व अभ्यास केला.
* १९१८ साली बालगंधर्व यांच्या ' गंधर्व कंपनी 'त प्रवेश. सुमारे दोन तपे मास्तरांनी विविध भूमिका करून रंगभूमीची सेवा केली. मा. कृष्णराव प्रामुख्याने स्त्री-भूमिकाच करीत. प्रसंगविशेषी शरद

( एकच प्याला ), नारद ( सावित्री ) याही भूमिका निभावून नेत. 'विद्याहरण' 'संशयकल्लोळ' 'सौभद्र' 'द्रौपदी' 'मेनका' यातील स्त्री-भूमिकांना प्रेक्षकांकडून दाद मिळे. मास्तरांच्या लडिवाळ गाण्यांनी ते मोहून जात.

* नाटकांबरोबरच मा. कृष्णरावांनी शास्त्रीय संगीताच्या मैफिली सुरु केल्या. नाटक व मैफिली यामुळे ते प्रसिद्धीच्या झोतात आले. हिज मास्टर्स व्हॉईस कंपनीने १९२१ साली मास्तरांच्या दोन ध्वनिमुद्रिकाही काढल्या.

* ८ एप्रिल १९२२ रोजी भास्करबुवांचे निधन. 'तुमचं गाणं मी अखेरपर्यंत गात राहीन' अशा शब्दात मास्तरांनी त्यावेळी श्रद्धांजली वाहली होती.

* १९२२ साली गांधर्व महाविद्यालयाच्या सभागृहात मास्तरांची शास्त्रीय गाण्याची खऱ्या अर्थाने पहिली मैफिल झाली. पुढे अशा बैठका नेहमीच होऊ लागल्या. मधुर आवाज, लालित्यपूर्ण पेशकारी, गतिमानता याबरोबरच रंजकता आणि श्रोत्यांचा अचूक अंदाज ही मास्तरांच्या यशस्वितेची सूत्रे होती.

शास्त्रीय संगीताच्या अशा मैफिलीतच ते नाट्यगीते, अभंग, गौळणी असे प्रकारही हाताळीत. त्यामुळे बहुजन रसिकही मास्तरांवर खूष होई.

* गंधर्व नाटक मंडळी १९३३ मध्ये सोडल्यानंतर विख्यात दिग्दर्शक व्ही. शांताराम यांनी मास्तरांना 'प्रभात'मध्ये पाचारण केले. संगीत दिग्दर्शक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. १९३३ ते ४१ या कालावधीत मास्तरांनी प्रभात फिल्म कंपनीच्या 'धर्मात्मा' 'माणूस' 'गोपालकृष्ण' 'अमरज्योती' 'शेजारी' 'लाखारानी' आणि 'वहाँ' या चित्रपटांचे संगीत दिग्दर्शन केले.

'धर्मात्मा' 'माणूस' आणि 'शेजारी' हे तीन चित्रपट मराठीप्रमाणेच हिंदीतही निघाले.

या संगीत दिग्दर्शनामुळे मा. कृष्णराव यांचे नाव आणि कर्तृत्व महाराष्ट्रातच काय पण साऱ्या देशभर पसरले. याच कालावधीत मास्तरांनी आचार्य अत्रे यांच्या 'वसंतसेना' चित्रपटालाही संगीत दिले होते.

* १९४२ च्या सुमारास व्ही. शांताराम 'प्रभात' मधून बाहेर पडले व त्यांनी मुंबईत 'राजकमल'ची स्थापना केली. 'भक्तिचा मळा'

( हिंदी ' माली ' ) या सावता माळीच्या जीवनावरील चित्रपटाने प्रारंभ झाला. मा. कृष्णरावांनी त्याचे संगीत दिग्दर्शन केले; एवढेच नव्हे तर त्यात सावता माळीची प्रमुख भूमिकाही केली. या चित्रपटाने अमाप यश मिळविले. त्यातील गाणीही कमालीची लोकप्रिय झाली.

* १९४५ मध्ये कोल्हापूरच्या विकास पिक्चर्सतर्फे निघालेल्या ' मेरी अमानत ' या चित्रपटाला मा. कृष्णराव यांचेच संगीत होते. श्रीधरपंत या शाळामास्तरची भूमिकाही त्यांनी त्यात केली. त्यानंतर ' माणिक स्टुडिओज 'च्या ' कीचक वध ' आणि ' विठू माझा लेकुरवाळा ' या चित्रपटांना मास्तरांनी संगीत दिले.

* १९४६ पासून मात्र मा. कृष्णराव चित्रपट व्यवसायातून मुक्त झाले.

* नाटकातील चाली साध्या-सोप्या पण कायमच्या लक्षात राहून गुणगुणण्यासारख्या असाव्यात हीच मास्तरांची भूमिका. त्याला दाद मिळाली ' नाट्यनिकेतन 'मध्ये. मो. ग. रांगणेकरांच्या या संस्थेशी मास्तरांचा संबंध जिव्हाळ्याचा होता. ' कुलवधू ' ' एक होता म्हातारा ' ' कोणे एके काळी ' ' भाग्योदय ' ' धुळीचे कण ' या नाटकातील पदांना मास्तरांनी समर्थपणे चाली दिल्या. ' कुलवधू 'तील गाणी तर विलक्षण लोकप्रिय ठरली.

* स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राष्ट्रगीत कोणते असावे? याबाबत चर्चा, विचारविनिमय सुरू झाला. ' वंदेमातरम ' हेच राष्ट्रगीत असावे म्हणून मास्तरांनी सर्व प्रयत्न केले. प. नेहरू, राजेंद्र प्रसाद यांच्या भेटी घेतल्या. ' वंदेमातरम् 'ची ध्वनिमुद्रिकाही काढली. परंतु अखेरीस ' जन गण मन ' हेच राष्ट्रगीत ठरले.

* १९५३ च्या जुलै महिन्यात भारतीय कलावंतांचे एक सांस्कृतिक मंडळ चीनला पाठविण्यात आले. त्याचे नेतृत्व मास्तरांनी केले. कलावंतात हिराबाई बडोदेकर, ज्योत्स्ना भोळे, मधुकर गोळवलकर, उस्ताद विलायतखाँ, दमयंती जोशी, महादेव इंदूरकर यांचा समावेश होता.

* जानेवारी १९५८. मास्तरांची षष्ठ्यब्दिपूर्ती त्यावेळचे माहिती व नभोवाणीमंत्री डॉ. बी. एन. केसकर यांच्या अध्यक्षतेखाली पार पडली. जाहीर सत्कार झाला. ९ दिवस गायन-वादनाचे कार्यक्रम झाले. त्याला बालगंधर्व, मा. मनोहर बर्वे, विनायकबुवा पटवर्धन,

कागलकरबुवा, भीमसेन जोशी, गजाननराव जोशी, थिरकँवा, पं. रविशंकर, गंगूबाई हनगळ, हिराबाई बडोदेकर यांनी हजेरी लावली होती.

* ५ नोव्हेंबर १९६९ रोजी मास्तरांना नाट्याचार्य विष्णुदास भावे सुवर्ण पदक सांगली येथे देण्यात आले.

* भारत सरकारने १९७१ मध्ये त्यांना 'पद्मभूषण' हा किताब राष्ट्रपती व्ही. व्ही. गिरी यांच्याहस्ते प्रदान केला. त्या पाठोपाठ १९७२ मध्ये संगीत नाटक अकादमीने मास्तरांना 'फेलोशिप' दिली.

* २० ऑक्टोबर १९७४. मास्तरांचे मेंदूतील रक्तस्रावाने निधन झाले आणि या संगीत कलानिधीचा अस्त झाला.

x x x

# बोला अमृत बोला

'बोला अमृत बोला' या पुस्तकातील श्री. सुधाकर अनवलीकर यांनी शब्दांकित केलेल्या मास्तर कृष्ण-रावांच्या आठवणी मला पुन्हा माझ्या गतायुष्यात घेऊन जातात. या पुस्तकाच्या रूपाने मा. कृष्णराव यांच्या अनेक आठवणींचा खजिनाच पुन्हा आपल्या-पुढे उभा केला आहे. आठवणींचे असे भाग्यशाली क्षण कसे वळवाच्या पावसासारखे येतात आणि आले आले म्हणता म्हणता निघूनही जातात! स्मृतीच्या कवेत सामावून ठेवावे म्हटलं तरी सामावत नाहीत. पण या पुस्तकाच्या रूपाने मास्तरांच्या आयुष्यातील आठवणी मराठी रसिकांपर्यंत पोहोचविण्याची चांगली कामगिरी लेखक आणि प्रकाशक यांनी केली आहे. त्याबद्दल त्यांना धन्यवाद.

– ज्योत्स्ना भोळे
(प्रस्तावनेतून)